


नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






ऑगस्ट-क्रान्ति-स्मृति-विशेषांक




वर्ष २६ वे ● मूल्य २ रुपये

## श्रेयनामावली

● वेगळ्या नेतृत्वाची गरज...सद्यःस्थितीवरील तोडगा–**गोविंद तळवलकर** ● समाजातील संघर्ष सांस्कृतिक स्वरूपाचा...संतप्त तरुणांच्या कृतीमागील कारण–**वि. वा. शिरवाडकर (कुसुमाग्रज)** ● तेरावा बळी... न्यायाची बूज राखण्यासाठी विज्ञानाचे साहाय्य–**अनु. सौ. शोभा बराडपांडे** ● मी पाहिलेले व ऐकलेले अत्रे...आचार्य अत्रे यांच्या जन्मदिनानिमित्त ही स्मृत्यंजली–**प्रा. मनोहर मा. आळतेकर** ● लसित बडफुकन...शिवकालीन आसामी शूरसेनापतीची कथा नि व्यथा–**माधव राजवाडे** ● जिणे न माझे लाजिरवाणे...नटीला वृद्धत्व आल्यावर अशी परिस्थिती होते...**प्रभाकर अत्रे** ● रात्रौ तरति नर्मदाम्...विद्वज्जड पतीचे पत्नीकडे दुर्लक्ष झाल्यामुळे–**अशोक परांजपे** ● भारतीय स्वातंत्र्याचा इतिहास...सटीक आणि सचित्र–**अशोक डोंगरे** ● याशिवाय दीपमाला, रंगमंच, ऐसी अक्षरे रसिके, इत्यादि माहितीपूर्ण सदरे आणि कविता.

**सुप्रिया :** लेखक व छायाचित्रकार पुरुषोत्तम बावकर **: कादंबरी**

● खाते नि खांदेपालट ●

मासिक विंगचित्रमाला

**दलाल आर्ट स्टूडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

टे. नं. ३५७७६५
Gram : DALALART

संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक : श्री. दीनानाथ दलाल, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथे छापले. या प्रतीस किंमत २ रु.+रजि. पोस्ट ८० पैसे. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १५. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. चित्रे व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन. Registered with the Registrar of Newspapers for India under RN No. 1612/57 DIPAVALI ; Dalal Art Studio, 42, Kennedy Bridge. Bombay-4.







अनुक्रमणिका

# दीपावली

**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई–४

टेलिफोन : ★ तारेचा पत्ता :

३५७७६५ DALALART

● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १५ द्वैवार्षिक वर्गणी रु. २५; त्रैवार्षिक वर्गणी रु. ३० परदेशी वार्षिक वर्गणी रु. २०

● **वर्गणी मनिऑर्डरने** द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास १.५० पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्यास** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य गहाळ** झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

---

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. दीनानाथ दलालयांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.


## गाऊ त्यांना आरती....

ऑगस्ट महिना ! अनेक दृष्टींनी महत्वाचा. संस्मरणीय. एक ऑगस्ट ही लोकमान्य टिळकांची पुण्यतीथ ! "मुक्या मनाने किती उधळावे शब्दांचे बुडबुडे । तुझे पवाडे गातिल पुढती तोफांचे चौघडे" अशा समर्थ शब्दात स्वातंत्र्यशाहीर कवि गोविंदांनी त्यांच्या कर्तृत्वाची कीर्ती गायली आहे. "स्वराज्याचा जन्मसिद्ध हक्क" प्राप्त झाला तोही ह्याच महिन्यात–१५ ऑगस्टला ! त्यासाठी 'चलेजाव'ची क्रांतीकारी घोषणा गरजली तोही ह्याच महिन्यात. आणि १० मे १८५७ याविवशी सुरू झालेला स्वातंत्र्यसंगर सरला तोही ह्याच महिन्यात. एक अनैसर्गिक, अस्वाभाविक आणि इतिहास-विसंगत विभाजन घडले तेही ह्याच महिन्यात ! स्वराज्य आले. स्वराज्याचा आम्ही जयजयकार केला, करतो व करीत राहू. पण त्याच दिवशी झालेली फाळणीची जखम जोवर वहाते आहे तोवर ह्या जयजयकाराच्या सप्त सुरातील एक सूर काहीसा बद्द होणेही अपरिहार्यच, नाही का ? आणि तरीही १८१८ त ज्याक्षणी स्वराज्याचे निशाण शनवारवाड्यावरून खाली आले, त्याक्षणी सुरू झालेल्या स्वातंत्र्य युद्धातील सशस्त्र, निःशस्त्र, सहानुभूति, आर्थिक सहाय्यावि अनेक पर्वात पिचलेल्या, पडलेल्या आणि पडता पडताही "बचेंगे तो और भी लढेंगे" वृत्तीने वागलेल्या सर्व ज्ञात, अज्ञात क्रांतिवीरांना आणि स्वातंत्र्य-सैनिकांना अभिवादन ! स्वराज्य आले असले तरीही सुराज्य येणे आहे. स्वातंत्र्य नांदणे आहे. उलट स्वातंत्र्य–संकोचाची प्रक्रिया सुरू झालेली दिसते अशा वेळी "तुमच्या न्यायालयापेक्षाही एक श्रेष्ठ न्यायालय जगात आहे" असे मदांध सत्तेला बजावणाऱ्या लोकमान्यांची आठवण, स्वतःसाठी काहीही न मागता देशाला सर्वस्व वाहणाऱ्या हुतात्म्यांची आठवण प्रेरक ठरेल हा विश्वास वाटतो.

## रसिक वाचका, थांब जरा !!

'विशेष कथा अंका'चे स्वागत करणारी अनेक पत्रे दप्तरी येऊन दाखल झाली आहेत. दाद देणारे रसिक लाभले की कुठलीही कलात्मक मैफल रंगतेच, नाही का ? त्या रंगतीत भर घालण्यासाठी म्हणून आम्ही त्या अंकापासून क्रमशः प्रसिद्ध करीत असलेल्या 'सुप्रिया' ह्या बावकरांच्या कादंबरीचे तर अक्षरशः 'तुफान' स्वागत झाले. आणि मग काही चौकशीची (ही) पत्रे आली. "अनुवादित की रूपांतरित ? नाव का दिले नाही ? तोंडवळा असा असा वाटतो." "मग मूळ लेखकाचे काय ?" अनेक प्रश्न ! चांगले ! प्रामाणिक तळमळीतून विचारले गेलेले. एक गोष्ट खरी–कादंबरी रसिक वाचकांनी 'उचलली'. आमचे अंदाज खरे ठरले. आता पुढील भाग असेच गाजतील हा विश्वास ! पण उत्तराचं काय ? देऊ की ! काय घाई आहे ? रसिक वाचक, तुम्ही कादंबरी रसिक मनाने वाचा ! एंजॉय करा. निर्व्याज मनाने त्या सुप्रियाच्या सुखदुःखांशी समरस होण्याचा प्रयत्न करा ! कलाकृतीचा आनंद कलाकृती म्हणून घ्या. आणि प्रश्नांची उत्तरे ?

प्लीज वेट ! रसिक वाचकहो, कादंबरी क्रमशः प्रसिद्ध होतच आहे, तोपर्यंत जरा धीर धरा.

— संपादक

## संगीताविषयी उत्सुकता निर्माण झाली

स. न. वि. वि.

वस्तुतः दीपावली संगीत विशेषांकाची पसंती कळविण्यास फार उशीर झाला. आमच्यासारख्या 'अ'कानसेनांनाही शास्त्रीय संगीताविषयी उत्सुकता निर्माण करण्यात आपल्या संगीत–अंक परंपरेचा फार मोठा वाटा आहे. घराणी, परंपरा व नावीन्य याविषयी संगीत अंकातील मते वरीच बोलकी व विचाराला चालना देणारी आहेत.

श्री. अरविंद मुळगावकर यांच्या संगीतविषयक कथेचा सूर उत्तम जुळला आहे, पण 'बांसरीचे स्वर येती दुरूनिया' ही श्री. अरविंद गजेंद्रगडकर यांची कथा मात्र लांबीच्या दृष्टीने बेताल झाली आहे.

श्री. न. र. फाटक यांनी संगीतसृष्टीतही यशस्वी पदार्पण केले होते हे वाचून धक्काच–अर्थात गोडसा–बसला.

श्री. अ. वि. वेडेकर यांनी मराठी रंगभूमीवरील संगीत आणि संगीतकार यांचा घेतलेला परामर्श यथायोग्य वाटला.

संगीत अंकाप्रमाणेच रंगभूमी आणि चित्रपट विशेषांकही 'दीपावली'ने प्रसिद्ध करावेत असे वाटते.

**आरामनगर,** आपला
**अंधेरी, मुंबई ५८.** **'अ' कानसेन**

## हिंदू समाजास जागे करण्याचा प्रयत्न

स. न. वि. वि.

'दीपावली'च्या एप्रिल अंकात बर्ट्रॉण्ड रसेल यांच्या तत्त्वज्ञानाची ओळख करून देणारा लेख फार महत्वाचा वाटला. महत्वाचा अशासाठी की तत्वज्ञानाची ओळख देऊन शिवाय आम्हास त्याकडे कोणत्या दृष्टिकोनातून पाहिले पाहिजे हेही प्रा. ग. ना. लवंदे यांनी ठराविक साच्याच्या तत्वनिष्ठेच्या मोहाने व्यापलेल्या हिन्दू समाजास जागे करण्याचा प्रयत्न केला आहे. वास्तविकतेचा विचार न करिता अनुभवहीन तत्वज्ञान प्रतिपादन करणाऱ्यानी इकडे लक्ष दिले तर हल्लीच्या हीन स्थितीतून बाहेर पडण्याचा मार्ग खात्रीने सापडेल.

**उज्जैन** आपला
**(मध्यप्रदेश)** **काशिनाथ शितूत**

## दर्जेदार संगीत अंक

स. न. वि. वि.

आपला संगीत विशेषांक वाचनात आला. माझ्यासारख्या संगीत विषयाच्या अध्यापकाला त्यातल्या बऱ्याच गोष्टी घेण्यासारख्या वाटल्या. फातरपेकर यांची मुलाखत चांगली आहे. अत्रे व अभिषेकी यांच्या मुलाखती घेताना श्री. परांजपे यांनी केवळ भावनेचाच जास्त विचार केलेला दिसतो आहे. त्यांचे शब्द सामर्थ्यशाली आहेत म्हणूनच एक महत्वाची सूचना अशी की शास्त्रीय गाणे जसे भावनाप्रधान हवे तसे त्यात 'स्वरां'चा विशेष विचार करणे प्राप्त आहे. त्यातल्या सौन्दर्याचा विचार परांजपे यांनी 'स्वरनिष्ठ' व 'लयनिष्ठ' विचारपद्धतीने करून आपल्या आकर्षक शैलीत पुन्हा मांडावा असे वाटते. नव्या तऱ्हेने शास्त्रावर प्रकाश पडला पाहिजे. काही भावगीतांना शास्त्रोक्त साज चढविण्याचा आम्ही प्रयोग केला आहे. तो यशस्वी झाला आहे. संगीत अंक काढल्याबद्दल धन्यवाद !

**पारशीवाडा,** आपला
**मुंबई ४.** **प्रा. अरविंद मनगोळकर**

## परंपरेला साजेसा संगीत अंक

स. न. वि. वि.

दीपावलीचा मे १९७० संगीत विशेषांक वाचला. परंपरेला साजेसा अंक काढल्याबद्दल धन्यवाद ! अरविंद गजेंद्रगडकर यांची कथा दीर्घ असल्याने पकड घेऊ शकली नाही. पं. सीताराम फातरपेकरांचे विचार लक्षात घेण्यागत आहेत. साघले यांनी विविध वाद्यांची माहिती अभ्यासपूर्वक दिली आहे. पण अंक रंजक झाला आहे तो लहान लहान पण अतिशय ललित अशा 'संगीत क्षणिकांनी.' श्री. अशोक परांजपे यांची लेखणी आता चांगलीच रंग धरू लागली आहे. कु. प्रभा अत्रे व श्री. जितेन्द्र अभिषेकी यांचे विचारदर्शन विचारशुद्ध वाटले. मुखपृष्ठ एकदम छान.

आणखी एक सूचना : आपण चित्रकार–संपादक आहात, तेव्हा आपल्याकडून 'चित्रकला विशेषांकाची' अपेक्षा आहे. ती वावगी न ठरावी.

**पोतदार मेडिकल कॉलेज,**
**मराठी वाङमय मंडळ,** आपला
**मुंबई १८.** **रसिक विद्यार्थी**




## हृदय हेलावणारी प्रेमकथा

स. न. वि. वि.

जून अंकातील श्री. राम शिर्के यांची 'यज्ञ' कादंबरी वाचली. ती मला आवडली. खुजुराहो किंवा मोहेंजोदारो या ठिकाणच्या वातावरणासारख्या भूमीवर आपण गेलो आहोत व विश्वकर्मा यांचे सुंदर शिल्प-स्वप्न आपल्या डोळ्यासमोर साकार होत आहे असा भास झाला. शिल्पकलेच्या पार्श्वभूमीवर विणलेली आनंदमालविका यांची शोकान्त प्रेमकथा हृदय हेलावून गेली.

श्री. उसेकर यांची प्रवासवर्णन-माला प्रथमपासून वाचत आहे. ते लंडनला केव्हा पोहोचणार असा एक विचार मनात डोकावून गेला.

श्री. सीताराम मणेरकर यांचे व्यक्तिवर्णन वाचून असे गुणी सज्जन आपल्याकडे आहेत याबद्दल अभिमान वाटला

**चरई,** आपली
**ठाणे.** **सुनंदा करमरकर**

अनुक्रमणिका






—वि. वा. शिरवाडकर

# समाजातील संघर्ष सांस्कृतिक स्वरूपाचा?

**...आधुनिक काळाचं बाह्यांग येथे प्रस्थापित होत आहे... पण सर्व साधारण समाजाचं अंतःकरण मात्र अजून जुन्याशीच निगडीत आहे... हीच आजच्या संतप्त तरुणांची व्यथा आहे...**

तरुण माणसाचं सर्वात महत्वाचं वैशिष्टच हे की-तो म्हातारा असत नाही असं एका लेखकानं म्हटलं आहे. वाह्यात्कारी निरर्थक वाटणाऱ्या या विधानात लेखकाला हे सांगायचं आहे की तरुणांचा दृष्टिकोन आणि वयस्कांचा दृष्टिकोन यामध्ये कोणताही आणि कोठल्याही काळी सारखेपणा असत नाही. प्रौढ माणसांची मनं परिस्थितीला सरावलेली असतात, कमीअधिक प्रमाणात वोथट झाल्यामुळे सतत तडजोडीच्या आणि सुवर्णमध्याच्या शोधात असतात. तरुणांच्या बाबतीत ही सावधानता संभवत नाही. त्याची प्रतिक्रिया तीव्र, एकांतिक आणि लढाऊ असते—निदान असायला हवी. या दोन भूमिकांतील तफावतीमुळे दोन पिढयातील वैचारिक झगडा आजच नव्हे तर प्रत्येक कालखंडात आपल्याला दिसून येतो. या झगडयामध्ये प्रगतीची काही सूत्रे गुंफलेली असतात. त्यामुळे ते अकारण अथवा निरर्थक असतात असं समजायचं कारण नाही. कोणी काही म्हटलं तरी सामाजिक प्रगतीची दिशा कालानं आणि इतिहासानं निश्चित केलेली असते. सामाजिक प्रगती म्हणजे व्यक्तिगत हितसंबंधीयांपासून दूर असलेली, समाज नांवाच्या एका अमूर्त संस्थेची प्रगती नव्हे. समाजाची अप्रगत, अन्यायात्मक आणि मागासलेली अवस्था ही व्यक्तीच्या विकासातही पावलोपावली आज येत असते आणि म्हणूनच समाजात असं असायला पाहिजे किंवा असं नसायला पाहिजे असा व्यापक विचार त्याच्या मनात उत्पन्न होतो. जीवनाच्या पर्वतावरून खाली उतरणाऱ्या प्रौढापेक्षा त्यावर चढणाऱ्या तरुण माणसाला या अडचणीची आणि प्रतिवंधांची जाणीव अधिक तीव्रतेने व्हावी हे स्वाभाविक आहे. आजही अनेकांना ती होत आहे आणि त्याच्या तीव्र प्रतिक्रिया विद्यार्थ्यांच्या मनोवृत्तीत, तरुणांच्या चळवळीत आणि काही प्रमाणामध्ये वाङमयातही व्यक्त होत आहेत. द्वंद्व असते हे गृहीत धरायला हवे आणि ते असायला हवं हेही मानायला हवे. पण विकासाच्या रस्त्यावर आड येणाऱ्या प्रतिवंधापैकी कोणते खरे आहेत, कोणते काल्पनिक अथवा अतिशयोक्त आहेत, याचा विचार होणे आवश्यक आहे.

आपण महाराष्ट्रापुरता विचार केला तरी महाराष्ट्रातील तरुण माणसांची मनं नाराज व्हावीत, काजळून जावीत अशी परिस्थिती समोवार आहे का? असल्यास नेमकी कोणत्या बाबतीत आहे. मानवी जीवनाच्या भौतिक आणि नैतिक अशा दोन कक्षा जर आपण मानल्या तर भौतिकाच्या कक्षेतील परिस्थिती पूर्वीच्या मानानं आज खूपच सुधारली आहे हे मान्यच करावं लागेल. स्वातंत्रपूर्व काळात तेव्हांच्या तरुणांपुढे असलेली निर्वाहमार्गाची निवड फार मर्यादित होती आणि प्रत्येक मार्गावर परकीय सत्तेनं जागोजाग घातलेले बांधही फार मजबूत होते. सरकारी नोकरी हा पांढरपेशांचा स्वर्ग असे. हजार क्लृप्त्या करून आणि वशिले लावून सरकारी नोकरी मिळवायची आणि इमानेइतवारे काम करून ती पेन्शनीपर्यंत पोचवायची. वऱ्यापैकी पेन्शन मिळवणे हे ज्या समाजातील पांढरपेशा कर्तबगारीचं उद्दिष्ट होतं तो मनानं किती अधू होता हे सांगायचं कारण नाही. पण हे दुखणं माणसाचं नव्हतं तर गुलामगिरीतून निर्माण झालेल्या परिस्थितीचं होतं. सरकारी नोकरीची परिणतीही बहुधा कारकुनाच्या किंवा तत्सम जागेमध्ये होत असे. त्या सरहद्दी पलीकडे म्हणजे अधिकारशाहीच्या प्रांतात काळया कातडीला मज्जावच असायचा. या शिवाय उपलब्ध असलेले सन्मानाचे व्यवसाय म्हणजे वकिली, डॉक्टरकी आणि शाळा—कॉलेजातील मास्तरकी. सुशिक्षित जीवनाची कर्तबगारी व महत्त्वाकांक्षा या चार व्यवसायांच्या चतु:सीमेत बांधलेली होती. यांत्रिक उद्योगाची मध्यम-



अनुक्रमणिका

वर्गीय कल्पना पिठाच्या गिरणीभोवती रेंगाळत होती आणि दुकानदारी हा विषय खालच्या पातळीवरच मानला जात होता. अशा परिस्थितीत, विशेषतः दुसऱ्या महायुद्धाच्या अगोदरच्या दशकात तरुणांची आर्थिक आघाडीवर जी कोंडी झाली होती तिला अलीकडच्या इतिहासात तोड सापडणार नाही. जानपद भागातील अवस्था तर याहून शोचनीय होती. उद्योगधंद्यांच्या अभावी तेथील सर्व आर्थिक व्यवहार शेतीभोवती उभारलेला असे आणि त्यातून उत्पन्नाचे नव्हे तर उत्पन्नाच्या अभावाचे, म्हणजे अपार दारिद्र्याचे वाटप मात्र सर्व संबंधितांमध्ये होत असे. पन्नास–साठ विघे जमिनीचा मालकही पुरेशा अन्नाशिवाय आणि पुरेशा कपड्याशिवाय दिवस काढीत असे. या सर्व दारिद्र्याभोवती अज्ञानाचे, अंधश्रद्धेचे आणि अशिक्षितपणाचे संरक्षक कोटकिल्ले असल्याने त्यातून बाहेर पडावयास मार्गही उपलब्ध नव्हता.

## आजचा भाग्यवान तरुण

आजचा सर्वसाधारण तरुण त्या मानाने फार अधिक भाग्यवान आहे असं मला वाटतं. हा तरुण स्वातंत्र्यकाळात जन्मलेला किंवा वाढलेला आहे. पारतंत्र्यातील सर्वस्पर्शी कुचंबणा त्याच्या वाट्याला आलेली नाही, नव्हे ती त्याला समजूही शकणार नाही. व्यावसायिक जीवनाचे शेकडो दरवाजे आज त्याच्यासमोर खुले झालेले आहेत. कारखानदारीच्या विकासामुळे विज्ञानाशी आणि यंत्राशी संबंधित असलेल्या कितीतरी क्षेत्रांमध्ये आज त्याला प्रवेश करता येतो आणि संधी मिळाल्यास त्यात अखेरच्या तळापर्यंत जाता येते. कोयनेसारखी जागतिक महत्वाची धरणे आज हिंदी इंजीनियर्सच्या नेतृत्वाखाली बांधली जातात, मोठमोठ्या कारखान्यांची संचालकपदे आज हिंदी माणसांकडे असतात, लष्कर, हवाईदल, आरमार, बँका, संशोधनकेन्द्रे, विविध रासायनिक कारखाने, व्यापारी कंपन्या, यंत्रोत्पादक उद्योग असे कितीतरी व्यवसाय आज भारतीय कर्तबगारीला आणि प्रतिभेला आवाहन करताना दिसत आहेत. महायुद्धापूर्वीचा आणि स्वातंत्र्यापूर्वीचा भारत हा केवळ ब्रिटीशांच्या गुलामगिरीतच रुतलेला होता असं नाही. त्याहीपेक्षा अवजड अशा मानसिक वैचारिक गुलामगिरीचं जोखड त्याच्या मानेवरती होतं. संधी नव्हती आणि ती प्राप्त करून घेण्यासाठी आवश्यक असलेली मानसिक ताकदही नव्हती. महाराष्ट्रातील एका लहानशा खेड्यात प्राथमिक स्वरूपाचे लोहारकाम करणारा छोटा कारखाना आज केवळ भारतातच नव्हे तर युरोपातील पुढारलेल्या देशातही आपले उद्योग उभारतो ही घटना मला तरी ऐतिहासिक महत्त्वाची वाटली. हजार वाईट गोष्टी घडल्या असतील, आजही घडत असतील, पण शिक्षण, नोकरी आणि स्वतंत्र व्यवसाय या बाबतीतील तीसचाळीस वर्षांपूर्वीची कोंडी आज राहिलेली नाही यात शंका नाही.

तेव्हा संधी नाही हे तरुणांच्या असमाधानाचं अथवा झगड्याचं कारण आहे असं मला वाटत नाही. कोणाच्या मनात ते असलं तर तुलनात्मक दृष्ट्या ते बरोबर नाही. शहरी भागाप्रमाणं जानपद भागातही नव्या युगाची जाणीव हलके हलके आकार घेत आहे हेही लक्षात घ्यायला हवे. महाविद्यालयाचं वरदान पूर्वी मुंबई–पुण्यासारख्या मोठ्या शहरानाच होतं. आज दहावीस हजार वस्तीच्या गावीही महाविद्यालये निघाली आहेत आणि खेड्यातील सहस्रावधी तरुण नाना प्रकारच्या हालअपेष्टा सहन करून तिथे जिद्दीनं घेत आहेत. महाराष्ट्रातील एक साखरकारखाना मी पाहिला, कोल्हापूरच्या परिसरात असलेला. पागोटा घालणारी आणि जमिनीशी जखडलेली माणसं या ठिकाणी संचालक म्हणून काम करीत आहेत. पण या पागोट्याखाली आधुनिक काळाशी जी समज उजाडलेली आहे ती शहरात सुशिक्षितांतही दुर्मिळ आहे. या कारखान्याने आपल्या परिसरात शाळाच नव्हे तर, 'उत्तम प्रतीचं सायन्स, आर्टस् व कॉमर्सचं कॉलिजही चालवलं आहे. आसपासच्या खेड्यातील विद्यार्थ्यांकरिता नाना प्रकारच्या प्रोत्साहक आणि सहाय्यकारी योजना अंमलात आणल्या आहेत. मातीविषयी तिरस्कार वाटणार नाही, पण नव्या काळाचे सत्व आत्मसात करता येईल असा संस्कार तेथे मुलांच्या मनावर केला जात आहे. अशी कितीतरी ज्ञात–अज्ञात केंद्रे आहेत जेथे हे नव्या मनूशी नातं जोडण्याचं काम उत्साहानं आणि निष्ठेनं चाललेलं आहे. अनेक शतकं, परंपरेनं निर्माण केलेल्या दलितावस्थेत समाजातील हा तरुण, शिक्षणाने संस्कारित होऊन आधुनिक संस्कृतीच्या दारामध्ये उभा राहिला आहे. पूर्वीच्या कोणत्याही पिढीला मिळाली नाही अशी संधी त्याला मिळाली आहे.

## संघर्ष कां निर्माण होतात ?

मग द्वंद्वाचं आणि नाराजीचं नेमकं ठिकाण कोठे आहे ? मला वाटतं आजच्या आपल्या समाजातील संघर्ष हा सांस्कृतिक स्वरूपाचा आहे. आधुनिक काळाचे बाह्यांग येथे प्रस्थापित होत आहे, पण सर्वसाधारण समाजाचं अंतःकरण अजून जुन्याशी बांधलेलं आहे. आधुनिकता हा केवळ परिस्थितीचा गुणविशेष नाही, तो मनाचाही गुणविशेष आहे. आधुनिकता आली आणि तिला आवश्यक अशी मनोरचना म्हणजेच नवी नीतिमत्ता आली नाही तर त्या विसंवादातून प्रत्येक क्षेत्रात संघर्ष निर्माण होतात, व्यक्ती आणि समाज यांचा संबंध पूर्वी दहा ठिकाणी येत असला तर तो आज हजार ठिकाणी येत आहे. यंत्र आणि विज्ञान यांनी माणसांचं अलगपण नष्ट केलं आहे, एकाला अनेकात ओढून घेतलं आहे. या सहस्रमुखी व्यवहारात व्यक्तीगत नीतीच्या अनेक पूर्वकालीन कल्पना निकामी ठरल्या असून व्यक्ती व समाज यांच्यातील संबंध सुरळीत, प्रामाणिक व सचोटीचे होतील अशी नवी नीतीकल्पना रूढ होणं आवश्यक

(पृष्ठ १० वर)



# वेगळ्या नेतृत्वाची गरज

—गोविंद तळवलकर
संपादक–महाराष्ट्र टाईम्स

गेल्या वर्षी जुलैमध्ये बंगलोर येथे काँग्रेसच्या पार्लमेंटरी बोर्डाने श्री. संजीव रेड्डी यांची बहुमताने राष्ट्रपतीपदाचे उमेदवार म्हणून निवड केली आणि तेव्हापासून काँग्रेस संघटनेला तडे जाऊ लागले. राष्ट्रपतीपदाच्या निवडणुकीचा वाद विकोपाला गेला आणि पंतप्रधान इंदिरा गांधी यांनी काँग्रेसचा उमेदवार पाडण्यास प्रत्यक्ष अप्रत्यक्ष साहाय्य केले. त्यानंतर काँग्रेसमधील दोन गटात तडजोड घडवून आणण्याच्या कामी यशवंतराव चव्हाण यांनी मध्यस्थी केली, पण तडा गेलेली काँग्रेस पुन्हा एकजीव झाली नाही. उलट डाव-प्रतिडाव खेळले गेले आणि काँग्रेस दुभंगली.

युद्धापेक्षा यादवी युद्ध भयंकर असते या न्यायाने दोन काँग्रेस पक्षांतील वैर व स्पर्धा विकोपाला गेली आहे. हे पक्ष एकत्र येण्याची चिन्हे दुरावत आहेत. अशा वेळी देशाचे राजकीय चित्र दिसते ते चिंताजनक म्हणावे लागेल. स्वतः इंदिरा गांधी यांचे काँग्रेस संघटना व केंद्र सरकार यांच्यावर वर्चस्व असेल, पण केंद्राची सत्ता घटक राज्यांवर पूर्वीप्रमाणे चालत नाही. केंद्रसत्ता दुर्बळ, केंद्रात अल्पमतातलं सरकार, सत्तारूढ पक्षात दुफळी, विरोधी पक्ष व सत्तारूढ पक्ष सत्ता मिळविण्यासाठी भावनात्मक राजकारण करण्यास सदैव सिद्ध अशी परिस्थिती आहे. घटक राज्यातील सरकारे व राज्यनिहाय पक्ष पोलाद कारखान्यापासून सीमा प्रश्नापर्यंत कोणत्याही प्रश्नावरून अटीतटीची भूमिका घेऊन लोकभावना प्रक्षुब्ध करण्यास तयार असे वातावरण देशभर आहे आणि म्हणून पंतप्रधान इंदिरा गांधी किती सामर्थ्यवान आहेत याचा हिशेब बिनमहत्त्वाचा असून सर्वसाधारण जनतेच्या दृष्टीने ही परिस्थिती कशी आहे ती अधिक महत्त्वाची आहे. जनतेच्या दृष्टीने ही परिस्थिती स्फोटक असून प्रांतवाद, जातीयवाद व नक्षलवाद यांना ऊत येण्यास अनुकूल आहे. अहमदाबाद, भिवंडी, जळगाव येथील जातीय दंगली, बंगालमधील अत्याचार इत्यादी वातावरणात सरकार कोठे ठिकाणावर आहे की नाही हा प्रश्न पडतो. पूर्णतः नव्हे, पण आपण बहादुरशहा जाफरच्या काळात दिल्लीचे सरकार जेवढे दुर्बल होते त्या अवस्थेप्रत आपण जाऊ लागलो आहोत. ओरिसाचे पटनाईक द्रविड मुन्नेत्र कळहमच्या धर्तीवर राज्यनिहाय पक्ष स्थापन करण्याच्या, राज्याच्या प्रश्नांना प्राधान्य देण्याच्या गोष्टी करतात हे चालू विघटनात्मक परिस्थितीस धरूनच आहे. काँग्रेसचे अध्यक्ष श्री. जगजीवनराम यांनीही सार्वत्रिक निवडणुकीच्या वेळी राज्यनिहाय पक्षांबरोबर निवडणूक करार करण्याची तयारी मध्यंतरी दर्शविली होती. वस्तुतः समाजवादाचा पुकारा करणाऱ्या काँग्रेस पक्षाने अखिल भारतीय पक्षाशी विशिष्ट कार्यक्रम ठरवून निवडणूक-करार करावयास हवा. त्याऐवजी प्रादेशिक पक्षाशी करार करावयास जगजीवनराम उत्सुक आहेत. याचा अर्थ एवढाच होतो की विशिष्ट कार्यक्रम ठरवून तो पार पाडण्याची जबाबदारी कोणाला उचलावयास नको. राजकीय नेत्यांचा हा अदूरदर्शी स्वार्थ देशाच्या दृष्टीने घातक आहे.

### थातुरमातुर करार निरुपयोगी

गेल्या वर्षी काँग्रेस दुभंगली या दुफळीला कोण जबाबदार, दोष अधिक कोणाकडे याची बरीच चर्चा यापूर्वी झाली आहे. आता प्रश्न उभा रहातो तो हा, की दुफळी होऊन कोणी काय मिळविले ? निजलिंगप्पा, कामराज, मोरारजी इत्यादी नेत्यांना आज काही प्रांतांतच काय ते स्थान राहिले आहे. या उलट केंद्र-सत्ता व इतर काही राज्यातील सत्ता नव्या काँग्रेसकडे असली तरी संसदेत या पक्षाला अल्पमत आहे आणि कम्युनिस्ट, द्रविड मुन्नेत्र कळहम वगैरे पक्षांच्या पाठिंब्यावर अवलंबून राहावे लागते. जुन्या काँग्रेसची संघटना मर्यादित व मोडकळीस आलेली आहे, तर नव्या काँग्रेसला काही प्रांतात संघटनाही उभारता आलेली नाही. हे दोन पक्ष एकमेकांना नामोहरम करण्यास उत्सुक असल्याने उत्तर प्रदेशात भारतीय क्रांतिदल अधिकारारूढ झाले, पण यांच्या हाती सत्ता आली नाही. उत्तर प्रदेशचा हा धडा महत्त्वाचा असून सर्व सार्वत्रिक निवडणूक झाल्यास केंद्रातही याचीच पुनरावृत्ती होणार नाही असे नव्हे ! म्हणजे कोणत्याही कारणास्तव काँग्रेसमध्ये फूट पडलेली असली तरी त्यामुळे एका कोणत्या घटकाची ताकद वाढली असे नाही. व्यक्तिशः इंदिरा गांधींचा









अनुक्रमणिका

वरचष्मा स्थापन झाला असेल, पण निवडणुकीत व्यक्तिगत वर्चस्व फारसे उपयुक्त ठरत नाही, संघटनेचे पाठबळ लागते. ते या वर्षभरात देशभर कसे उभे करणार हा प्रश्न आहे. हे पाठबळ उभे न करता प्रादेशिक पक्षांशी वा मुस्लिम लीगसारख्या जातीय संघटना किंवा कोणाचेच बंधन नसलेले अपक्ष खासदार यांच्याशी थातुरमातुर करार करून राज्य चालवावयाचे ठरविले तर त्या सरकारला या देशाचे मूलभूत प्रश्न सोडविण्याच्या कामी काहीही प्रगती करता येणार नाही.

आजच्या परिस्थितीत उजव्या व डाव्या पक्षांनी स्वतंत्रपणे आघाडी करावी अशी सूचना केली जाते. राजकीय पक्षांची गर्दी झाली की आघाडीची कल्पना पुढे येणे साहजिक आहे. यापुढे कोणत्याच पक्षाला नजिकच्या काळात निर्विवाद बहुमत संसदेत मिळणार नसल्याने निवडणूक युती आवश्यकही ठरेल. त्याचप्रमाणे इंग्लंड, अमेरिका इत्यादी काही देशांची उदाहरणे समोर ठेवून दोन वा तीन पक्षच असावेत या उद्देशाने राजकीय ध्रुवीकरणाचा पुरस्कार काही करतात. हे राजकीय ध्रुवीकरण व्हावयाचे तर उजवे पक्ष व डावे पक्ष यांच्या दोन फळ्या पाडाव्या लागतील. जुन्या कॉंग्रेसने 'लोकशाही वाचवा' ही घोषणा करून जनसंघ व स्वतंत्र यांच्याशी एकजूट करण्याचे ठरविलेले दिसते. ही एकजूट यशस्वी होईलच अशी खात्री नाही. पण उजव्या पक्षांची एकजूट झाल्यावर डाव्या पक्षांना युतीची ओढ लागेल. श्री. सुब्रह्मण्यम यांनी तशी सूचना नव्या कॉंग्रेसच्या महासमितीपुढे केली होती. डाव्यांची आघाडी म्हणजे कोणाची ? तर नवी कॉंग्रेस, उजवा कम्युनिस्ट पक्ष, संसोपा व प्र. स. पक्ष यांची ! यापैकी संसोपाचा एक गट इंदिरा गांधींचे सरकार पडू नये असे मानणारा आहे. इंदिरा गांधींनी डाव्यांच्या आघाडीची हाक दिल्यास हा गट प्रतिसाद देईलही. पण सर्व पक्ष साथ देण्याची चिन्हे नाहीत. कारण पक्षाच्या बऱ्याच नेत्यांचा इंदिरा गांधींच्या समाजवादी धोरणावर विश्वास नाही. व्यक्तिशः त्यांना विरोध करण्यात संसोपाचे काही नेते पुढाकार घेतात आणि म्हणून इंदिरा गांधींनी डाव्यांच्या आघाडीचे आवाहन केले तर संसोपात फूट पडेल एवढेच. प्र. स. पक्षाने स्वतःहूनच 'अर्थपूर्ण संवाद' करण्याची भाषा सुरू केली आहे. निवडणूक जवळ आल्यावर हा संवाद अधिक अर्थपूर्ण होण्याचा संभव आहे. तथापि प्र. स. पक्षाला ६७ सालच्या निवडणुकीत एकंदर मतांच्या तीन सव्वातीन टक्के मते पडली आणि मुदतपूर्व निवडणुकीत तर हे प्रमाण अडीच टक्क्यांवर आले आहे. या स्थितीत प्र. स. पक्षाशी युती करून नव्या कॉंग्रेसची ताकद वाढेल असे नव्हे. दोन अडीच टक्के मते मिळविणाऱ्या पक्षाच्या साहाय्याने पाच सहा जागा जादा मिळतील, पण त्यामुळे नव्या कॉंग्रेसचा प्रश्न सुटत नाही.

### उजव्या कम्युनिस्टांशी युती अव्यवहार्य

संसोपा व प्र. स. यांच्याशी युती करण्याचे प्रयत्न नव कॉंग्रेसने केल्यास हे चित्र दिसणार असल्याने उरलेला डावा पक्ष म्हणजे उजवा कम्युनिस्ट पक्ष. तथापि याही पक्षाचा कणा मोडलेला आहे. कित्येक राज्यात त्याला स्थान नाही. डावा कम्युनिस्ट पक्ष व नक्षलवादी यांनी उजव्या कम्युनिस्ट पक्षाचे बळ खच्ची केले आहे. त्याच्या खऱ्या ताकदीच्या मानाने त्याचा गाजावाजा अधिक होतो, कारण रशिया त्याच्या पाठीशी असून इंदिरा गांधींनी रशियाशी विशेष मिळतेजुळते घेतले असल्याने उजव्या कम्युनिस्टांशी त्या राजकीय सौदा करतात, त्या पक्षाच्या काही पाठीराख्यांना सरकारात स्थान देतात, पण संसोपा व प्र. स. पक्ष पूर्णतः बरोबर येत नसतील तर केवळ उजव्या कम्युनिस्ट पक्षाबरोबर युती करणे इंदिरा गांधींना मानवणार नाही. कारण आज त्यांचे काही टीकाकार त्यांच्यावर जो कम्युनिस्ट धार्जिणेपणाचा आरोप करतात तो खरा ठरेल. म्हणून केवळ उजव्या कम्युनिस्टांशी हातमिळवणी करण्यास नवी कॉंग्रेस तयार होणार नाही.

तथापि तिने उघड करार न करता समजुतीने काही जागा उजव्या कम्युनिस्ट पक्षास सोडल्या तरीही संसदेत याचा बराच उपयोग होईलच याची खात्री नाही. शिवाय उजव्या कम्युनिस्टांशी हातमिळवणी केली तर आजच्या पेक्षा त्यांचे सरकारवर दडपण वाढेल. निवडणुकीपूर्वी आज हे दडपण आहे व त्यापुढे इंदिरा गांधींचे सरकार दबतही आहे; पण निवडणुकीनंतर पाच वर्षे हा दाब सहन करावयाचा की नाही याचा पंतप्रधानांना विचार करावा लागेल. शिवाय हा दाव आजच्या प्रमाणे काही सहप्रवाशांना सरकारात स्थान देण्यापुरता राहणार नाही. प्रत्यक्ष कम्युनिस्ट पक्षाच्या सदस्यांना सरकारात घ्यावे लागेल. ते इंदिरा गांधींना मानवणार नाही. यासाठी कम्युनिस्ट पक्षाशी युती करण्याचे त्या टाळतील. केंद्रात नव कॉंग्रेस व उजवे कम्युनिस्ट यांचे संयुक्त सरकार येणे हे देशाला घातक ठरेल. पूर्व युरोपात प्रथम अशीच सरकारे आली व नंतर कम्युनिस्ट राजवटी आल्या. त्याची पुनरावृत्ती टाळावयाची असेल तर नवकॉंग्रेसला उजव्या कम्युनिस्टांशी युती करून केंद्रात सत्तेत सहभागी करून चालणार नाही.

राजकीय ध्रुवीकरणाचा आणखी एक तोटा आहे. उजव्या व डाव्या पक्षांच्या दोन आघाड्या स्थापन झाल्या तर त्या नेहमीच अतिरेकी पवित्रा घेतील. उजवी आघाडी हा मुक्त अर्थ-व्यवस्थेचा पुरस्कार करून भांडवलशाही, नफेबाजी इत्यादींना मोकळे रान देण्याची मागणी करील, तर डावी आघाडी सर्वंकष नियंत्रणे, सर्वव्यापी सरकारीकरण इत्यादींचा पुरस्कार करून अर्थव्यवस्थेचा संकोच करील. वस्तुतः या दोन्ही टोकांच्या धोरणाने या देशाचे प्रश्न सुटणार नाहीत. देशाचा प्रचंड व्याप, विविधता, कमीअधिक विकास, खास परंपरा इत्यादींचा विचार करता येथे मिश्र अर्थव्यवस्था हवी त्याचप्रमाणे राजकीय पक्षाचे स्वरूप मिश्र हवे. काहीसा डावीकडे झुकलेला लोकशाहीनिष्ठ असा पक्ष ही या देशाची गरज आहे. या दृष्टीने पं. नेहरूंची मिश्र अर्थ-व्यवस्थेची कल्पना व कॉंग्रेसचे मिश्र स्वरूप शाबूत राखण्याची धडपड उल्लेखनीय होती. आता पुन्हा नव्या परिस्थितीची मर्यादा लक्षात घेऊन नव-कॉंग्रेसचेही हेच स्वरूप कायम ठेवावे लागेल आणि तसे झाल्यास जुन्या कॉंग्रेसलाही






नवकाँग्रेसशी सहकार्य करण्यास हरकत नाही. ते करताना दोन्ही पक्षातील हट्टी, अतिरेकी व सत्ताकांक्षी बाजूस ठेवले पाहिजेत आणि विविध प्रवृत्तींना एकत्र घेऊन जाणारे नेतृत्व प्रस्थापित व्हावयास हवे.

**आश्वासने कशी पूर्ण करणार ?**

असे नेतृत्वच देशापुढील प्रश्नांची उग्रता काही प्रमाणात कमी करू शकेल. हे प्रश्न सोडविणे, पूर्णतः सोडविणे, कोणत्याही पक्षास शक्य नाही. आपल्याकडे कोणताही प्रश्न हा पन्नास कोटींचा प्रश्न बनतो. सर्व पक्ष आपल्यापाशी रामबाण उपाय असल्याचा आव आणतात, पण ती दिशाभूल आहे. नागरी मालमत्तेवर मर्यादा वगैरे उपाय हे मर्यादित आहेत. ७६ सालपर्यंत प्रत्येकाच्या किमान गरजा भागविण्याचे आश्वासन नव-काँग्रेसने दिले आहे. पण ते कसे शक्य आहे ? ७६ सालानंतरही कित्येक लाख लोकांना महिन्याला पंधरा रुपयांपलीकडे प्राप्ती होणार नाही. ती तीस रुपये झाली तरीही किमान गरजा भागणे अशक्य. मग हे आश्वासन कशासाठी ? ६७ साली काँग्रेसने मुलांसाठी समाजवादी जाहीरनामा मान्य केला होता. काँग्रेसमध्ये दुफळी पडल्यावर नव्या काँग्रेसने त्याचा पुनरुच्चार केला. पण प्रत्यक्षात तो अंमलात आणावयाचा म्हणजे काय करावयाचे ? आज शाळेत ७ कोटी मुले आहेत. त्यांपैकी साडेतीन कोटी मुलांना दूध वगैरे मिळते असे मानले व उरलेल्या साडेतीन कोटींना रोजी पाव लिटर दूध द्यावयाचे म्हटले तर प्रत्येक मुलामागे ४० ते ५० पैसे पैसे खर्च करावे लागतील. या सर्वाचा वर्षाचा खर्च तीनशे कोटी येईल. हे पैसे कोणता पक्ष कोठून आणणार आहे ? या दोन वर्षाच्या आत जमीन सुधारणाविषयक कायदे निर्धारपूर्वक अमलात आणण्याचे नव्या काँग्रेसने जाहीर केले आणि जमिनीच्या मालकी हक्काच्या नोंदीचा गोंधळ नाहीसा करून या नोंदी अचूक करण्याचे आश्वासन दिले. पण दीड दोन वर्षात हे शक्य आहे काय ? या कामी गेल्या सहा महिन्यात किती प्रगती झाली ? ज्यांनी खोटया नोंदी केल्या त्यांनी खोटेपणाने जमिनी बळकावल्या आहेत. या जमिनी ते सुखासुखी सोडतील काय ? यातले किती काँग्रेसमध्ये आहेत व पदाधिकारी आहेत याची कल्पना तरी नेत्यांना आहे काय ? जमिनीची मालकी व वाटप हा अत्यंत जिकीरीचा प्रश्न आहे. पण तो चुटकीसरशी सुटेल अशी हवा नवी काँग्रेस निर्माण करीत आहे.

अशा रीतीने देशाचे जे उग्र प्रश्न आहेत ते सोडविण्यासाठी सत्तारूढ पक्ष वा अन्य पक्ष वास्तववादी भूमिका घ्यावयास तयार नाहीत. बेकारीबाबत अनेक योजना जाहीर होतात, पण शेती व उद्योगधंदे यात मोठ्या प्रमाणावर भांडवल गुंतविण्याशिवाय रोजगारी वाढणार नाही. ही गुंतवणूक व्हावयाची तर भांडवलसंचय व्हावा लागेल व बचत व्हावी लागेल, कर बसवावे लागतील. राजकीय पक्ष याला तयार आहेत काय ? शेतीच्या उत्पन्नावर प्राप्तीकर बसविण्यास कोणी धजत नाहीत, सुवर्णनियंत्रण जारी करून अनुत्पादक व्यवहारातील पैसा सोडविण्याची तयारी नाही. या ज्या नकारघंटा आहेत त्या विकासाकडे नेणाऱ्या नसून विनाशाकडे नेणाऱ्या आहेत. जगातील पुढारलेले देश तेथील लोकांच्या कष्टाने संपन्न झाले. साम्राज्यवादी देशांना वसाहतींच्या बाजारपेठा मिळाल्या व रशियासारख्या कम्युनिस्ट देशास वेठबिगार व हुकूमशाही यांचा उपयोग झाला हे खरे असले तरीही या सर्व देशात लोकांनी कष्ट केले व राज्यकर्त्यांनी ते करावयास लावले. येथे लोक व राज्यकर्ते दोघांनाही कष्ट, गैरसोय नको. या स्थितीत समाजवादाच्या वा लोकशाहीच्या कोणी कितीही आरोळ्या ठोकल्या तरी जनतेचे प्रश्न सुटणारे नाहीत. म्हणून सध्यापेक्षा वेगळ्या नेतृत्वाची गरज आहे. ● ● ●

---

**-समाजाती संघर्ष...** [पान ७ वरून]

झालं आहे. तरुणांच्या नाराजीचं, झगड्याचं एक मोठं कारण या विसंवादात म्हणजे सामाजिक जीवनाच्या नैतिक कक्षेत आहे असं मला वाटतं.

लोकशाहीच्या पहिल्या पुरात लोकजीवनातील सर्व अमंगल आणि विघातक गोष्टी बाहेर येतात याचा प्रत्यय आज आपल्याला येत आहे. भ्रष्टाचाराला सर्वत्र ऊत आलेला आहे. जातीयतेची पिशाच्चं सर्व क्षेत्रात थैमान घालीत आहेत, द्रव्यलालसेच्या चक्राखाली मूल्यांचा आणि माणसांचाही चुराडा होत आहे. या परिस्थितीत, नव्यानं प्रवेश करणारी तरुण माणसं मांबावून जावीत, अस्वस्थ व्हावीत यात नवल नाही. सार्वजनिक जीवनात, मग ते कचेरीतले असो, कारखान्यातील असो किंवा विद्यालयातील असो, प्रामाणिकपणाला, सचोटीला काही जागा आहे की नाही असा प्रश्न त्याच्या मनात उभा राहिल्यावाचून राहात नाही. एका मोठ्या कारखान्याच्या परिसरात नव्यानंच रुजू झालेल्या एका तरुण सरकारी अधिकाऱ्याची हकीगत मला माहीत आहे. कर्तव्यनिष्ठेच्या काही निर्मळ कल्पना घेऊन तो विद्यापीठातून बाहेर पडला होता. या आडमुठेपणाचं शासन त्याला तेथे भोगावं लागलं. लाचलुचपत घेऊन कारखान्याच्या गैरकारभाराला संरक्षण देण्याचं त्यानं नाकारलं. दोन वर्षं झुंज देऊन सामादामाच्या साऱ्या प्रयोगांकडे त्याने पाठ फिरवली. कारखान्याच्या मालकाचाच नाही तर कचेरीतील सहकाऱ्यांचाही तो शत्रू झाला. शेवटी दंडाचे प्रयोग सुरू झाले आणि घरातल्या माणसांना रस्त्यावर वावरणंही अशक्य आहे हे पाहिल्यावर त्याचा धीर कोसळला. त्यानं नोकरीचा राजीनामा दिला. तरुणांमधील असंतोषाचं तोंड या आणि अशा प्रकारच्या अनेक अनिष्टांच्या निर्दालनाकडे वळलेलं असेल, आधुनिक काळाला आवश्यक अशा नव्या नीतीची प्रस्थापना हे त्याचं उद्दिष्ट असेल तर ते स्वागतार्हच मानायला हवे. या नव्या नीतीच्या जाणीवेनेचे त्यांच्या असमाधानाला विवेकाची आणि संयमाची बैठक मिळू शकेल. * * *

(आकाशवाणीच्या सौजन्याने)



अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास






# मी पाहिलेले व ऐकलेले अत्रे

—प्रा. मनोहर महादेव आळतेकर

माझ्या वडिलांनी फारसा पैसा जोडला नाही पण जन्मभर माणसे मात्र भरपूर जोडली. ते पैशाचे लोभी नव्हते पण माणसांचे मात्र लोभी होते. या पितृधनातील सगळचात तेजस्वी आणि बहुमोल रत्न – आचार्य **प्रल्हाद केशव अत्रे** होत. १९३३ साली वडिलांचे बोट धरून फिरत असताना जिच्यापुढे 'गगन ठेंगणे' वाटावे अशी अत्र्यांची उंच, रुंद, रंगाने सावळी, आपादमस्तक पाश्चात्य पोशाखात मिरविणारी, मोठ्याने बोलणारी आणि त्याहून मोठ्याने हसणारी मूर्ती मी प्रथम पाहिली. हा मानवी डोंगर माझ्या बालबुद्धीला जवळूनही साजरा वाटला. अत्र्यांच्या आकृतीशी स्पर्धा करणारी कीर्ती अजून काही वर्षे दूर होती. गुरुदक्षिणा आणि वीरवचन या मुलांच्या नाटकांचा कर्ता, गीतगंगा लिहिणारा कवि, महाराष्ट्र शारदेची झेंडूच्या फुलांनी पूजा बांधणारा विडंबनकार, वासंती या अभिनव शालेय कवितासंग्रहाचा प्रस्तावनाकार इतक्याच गोष्टी या माणसाबद्दल माझ्या ज्ञानभांडारात जमा होत्या. सिंहगड हा चित्रपट बघताना 'परिटा येशिल कधि परतून' ही कविता तारस्वरात म्हणणारे अत्रे पडदाभरून पाहिले आणि कानभरून ऐकले. आमच्या शेजारी खांदेवाले म्हणून एक ग्रंथवेडे गृहस्थ रहात असत. त्यांच्याकडे 'सचित्र झेंडूची फुले' होती. ती उचलून आणली, अनेकदा वाचली आणि संग्रही ठेवली. सगळ्या कविता आवडल्या पण संदर्भासकट समजल्या असे मात्र म्हणता येणार नाही. वासंतीच्या प्रस्तावनेवर तर मी बेहद्द खूश झालो. लहान मुलांना कोणत्या कविता आवडतात हे अत्र्यांनी अचूक ओळखले होते. मला वाटते, मराठी भाषेच्या या महान शैलीकाराचे पाय प्रथम या प्रस्तावनेच्या पाळण्यात दिसतात. इतकी गोंडस, रेखीव आणि आकर्षक प्रस्तावना मिळणे कठिण. प्रौढपणी अलंकारांची बाळलेणी कमी झाली, भाषा अधिक समर्थ, सार्थ आणि सुबोध झाली. पुस्तकीपणाचे कवच या १५–२० वर्षात तर पार गळून पडले; पण उत्साह तोच, आशयाचा सुस्पष्टपणा तोच, प्रांजळपणा तोच आणि मुख्य म्हणजे भाषेचा मराठमोळा घाट आणि थाट तोच.

१९३३ च्या उन्हाळ्यात पुण्यात साष्टांग नमस्कार नाटक मी वडिलांसहवर्तमान फुकट पाहिले. पुढे त्यांचे प्रत्येक नाटक असेच 'आमंत्रित' म्हणून पाहिले. असा फुकटचा प्रेक्षक मी काही एकमेव नव्हतो. फुकट नाटके आणि पुढे आपले चित्रपट दाखविण्यात अत्र्यांचा हात धरणारा केवळ महाराष्ट्रातच नव्हे तर या अवनीतलावर कोणी होऊन गेला असेल किंवा भविष्यकाळात होईल असे वाटत नाही. तर १९३३ साली नाटकाला आमचे तीर्थरूप पाहुणे आणि मी पडपाहुणा होतो. यजमान आमच्याच पंक्तीत बसले होते. अत्र्यांची भाषणे प्रसिद्ध करताना ज्ञानप्रकाशाने योजिलेल्या कंसातील हशा आणि टाळयांची जोडगोळी, अवखळ आणि खेळकर मुलांप्रमाणे सर्वत्र धुडगूस घालीत होती आणि त्यांचा जनक मोठ्या अभिमानाने आणि प्रेमाने प्रथम त्यांच्याकडे आणि नंतर प्रेक्षकांकडे बघत होता.







अनुक्रमणिका

या प्रयोगावरची एक आठवण जी माझ्याशी निगडित होती ती अत्रे उकरून काढीत आणि संभाषणात किंवा भाषणात रंगवून सांगत. "अहो या मुलामुळे माझे माधवराव पटवर्धनांशी जन्माचे वाकडे आले. माधवराव नाटक सुरू झाल्यावर थोड्या वेळाने आले त्यांच्यासाठी राखून ठेवलेल्या खुर्चीवर हे चिरंजीव स्थानापन्न झाले. होते. दुसरी खुर्ची आणतो म्हणेपर्यंत माधवराव रागाने ताडताड निघूनसुद्धा गेले." माधव जूलियनांना रागवायला झेंडूच्या फुलातील 'प्रेमाचे अद्वैत' यासारख्या काही कविता आणि 'साष्टांग नमस्कार' नाटकातील भद्रायू पुरेसा होता. त्यां पामराची गरज नव्हती.

एरव्ही रुबाब वाढविणारी आणि जनसमुदायात आदर, धाक आणि कौतुक निर्माण करणारी अत्र्यांची उंची त्यांना कधी कधी चांगलीच पेचात पकडीत असे. काही वर्षांपूर्वी ग्वाल्हेरचे जनरल राजवाडे मुंबईत अकस्मात मृत्यू पावले. खांदा देण्यास खुद्द अत्रे आणि जवळ जवळ त्यांच्याच उंचीचे प्रो. हुदलीकर होते. पण दुसरे दोघे होते ते या दोघांच्या उंचीपुढे अर्धेमुर्धे असल्यामुळे सोनापूरला पोचेपर्यंत आपण कसे हैराण झालो, ताटी एकसारखी कशी वरखाली होत होती याचे वर्णन खुद्द अत्र्यांच्या तोंडून ऐकण्यातच मजा असे. त्यात परत पाचव्या मजल्यावरून लिफ्टमधून प्रेत आणण्यास परवानगी नाही असे आयत्यावेळी नोकरांनी सांगितल्यामुळे पाच जिने उतरताना किती हाल झाले याचे हृदयद्रावक वर्णन अत्रे हसत हसत करीत असत.

## 'स्मशान-कथांचा संग्रह'

बाकी अत्र्यांच्याकडे स्मशानातील काही प्रत्यक्ष अनुभवलेल्या आणि काही ऐकलेल्या विनोदी गोष्टींचा फार मोठा संग्रह होता. कधी कधी खुद्द स्मशानातच गेलो असताना तीन चार तासांच्या मुक्कामात अशा कथांचा पुनरुच्चार होत असे. बॅरिस्टर जयकर मृत्यू पावल्यानंतर अंत्यसंस्कार करण्यापूर्वी "आज जयकर जमीनदोस्त झाले आहेत," अशी भाषणाची सुरुवात करून जमलेल्या सर्व मराठी भाषिकांना जमीनदोस्त करणाऱ्या ज्ञातिबांधवाची अत्रे गोष्ट सांगत तर कधी माधवराव पटवर्धन मरण पावल्यानंतर स्मशानात आलेल्या तात्यासाहेब केळकर, वामन मल्हार जोशी इ. वयोवृद्ध आणि ज्ञानवृद्ध साहित्यिकांच्या कडे बघत आणि हातवारे करीत, "जगात इतकी माणसे असताना परमेश्वराने माधवराव पटवर्धनानाच कां न्यावे ?" असा मौलिक प्रश्न उपस्थित करणाऱ्या प्रा. डॉ. न. का. घारपुरे यांची गोष्ट अत्रे रंगवून सांगत.

वामन मल्हार जोशी अल्प मुदतीच्या आजाराने मृत्यू पावले त्यावेळचा प्रसंग– डॉ. मालेराव यांच्या नेतृत्वाखाली मुंबई मराठी साहित्य संघ कोणतेही वाङमयीन कार्य करण्यास किंवा कंत्राट घेण्यास उत्साहाने तयार असे. एखाद्या नामवंत लेखकाचा आजार, त्यावेळी चिंतातुर चेहेरे करून अवतीभोवती धावपळ करणे, त्याच्या मृत्यूनंतर साग्रसंगीत तयारी करणे, प्रचंड स्मशानयात्रा काढणे, अग्निसंस्काराच्या वेळी भाषणे करणे आणि शेवटी शोकसभा घेणे,

**.... आचार्य अत्रे म्हणजे उत्कृष्ट लेखक, नट, नाटककार, कवी, पुढारी, पत्रकार, पट्टीचे वक्ते आणि सर्व काही.... त्यांच्या या महिन्यातील ७३ व्या जन्मदिनानिमित्त तळेगांवच्या इंद्रायणी महाविद्यालयाचे प्राचार्य म. मा. आळतेकर यांनी सांगितलेल्या या आठवणी....**

त्या समेत स्मारकासाठी निधी गोळा करण्याचा संकल्प जाहीर करणे या सर्व गोष्टी वाङमयीन कार्यातच जमा होत असल्याने अत्र्यांच्या शब्दात सांगायचे म्हणजे 'हा महाराष्ट्राचा तत्वज्ञ कादंबरीकार आटोपतो केव्हां व आपण त्याला उचलतो केव्हा यास्तव संघाचे कार्यकर्ते उत्सुकतेने टपून बसले होते. या सगळ्या अतिरेकांचा अतिरेक म्हणजे प्रा. गजेंद्रगडकरांच्या अध्यक्षतेखाली जेव्हां शोकसभा झाली तेव्हा अस्थींनी भरलेली काचेची बाटली अध्यक्षांच्या नाकासमोर टेबलावर ठेवण्यात आली. समोरची बाटली उचलल्याशिवाय अध्यक्ष सभेचे कामकाज सुरू करीनात. मृत्यूनंतर आपलेही असेच काही बरेवाईट होण्याचा संभव लक्षात घेऊन अत्रे, प्रा. कृ. पां. कुलकर्णी व आमचे तीर्थरूप (प्रा. मा. दा. आळतेकर) या तीन साहित्यिकांनी एक सामायिक मृत्युपत्र करावयाचे ठरविले. मृत्यूनंतर आमच्या देहाची काहीही वासलात लावा पण साहित्य संघाच्या हाती मात्र तो कधीही लागू देऊ नका अशी त्यात मुख्य अट घालावयाची होती. डॉ. मालेराव यांच्या अकाली झालेल्या मृत्यूनंतर अत्र्यांच्या अध्यक्षतेखाली दादर येथे लक्ष्मीनारायण बागेत शोकसभा भरली होती. इतरांची भाषणे चालू होती तोपर्यंत सभा शोकसभा होती पण अत्र्यांनी आपल्या भाषणात डॉ. मालेराव यांच्या संदर्भात इतक्या विनोदी गोष्टी सांगितल्या की प्रसंगाचे गांभीर्य विसरून श्रोते ओक्साबोक्सी हसायला लागले.

खुद्द अत्र्यांच्या आयुष्यातली शिवाजी पार्कच्या स्मशानातील एक घटना जितकी सुरस आणि चमत्कारिक तितकीच हृदयस्पर्शी आहे. आज इतक्या वर्षांनंतर आठवण झाली तरी मन काही काळ अस्वस्थ होते. काही वर्षांपूर्वी अत्र्यांची जवळजवळ तीस वर्षे नोकरी करणारा बाबू ड्रायव्हर मरण पावला. या आपल्या एकनिष्ठ श्रीखंड्याबद्दल अत्र्यांना फार प्रेम होते. बाबू हा नुसता नोकर नव्हता तर निरलसपणे अत्र्यांची सेवा व संरक्षण करणारी व त्यांच्याच सहवासात अहोरात्र असणारी ही एक संस्था होती. अत्र्यांचा आपल्या कुटुंबातील माणसांच्यावर विश्वास नसेल इतका बाबूवर होता. रात्री ९–९॥ च्या सुमाराला मला अत्र्यांचा फोन आला की बाबू गेला, स्मशानात जावयाचे आहे, घरी ये ! घरी गेलो. सुधाताईंना विचारले, "साहेब कुठे आहेत ? केव्हा येणार ?" "साहेब छापखान्यात आहेत. बाबूच्या मृत्यूमुळे झालेले अनावर दुःख चार दोन लोकांना मदतीला घेऊन दारुच्या पेल्यात बुडवत बसले आहेत. येतील." बोलणे चालू असतानाच रस्त्यावरून अत्र्यांच्या हाका ऐकू



अनुक्रमणिका






आल्या. मी मोटारमध्ये बसलो. "बाबूमुळे वरीच जास्त झाली आहे. म्हणून तुला मुद्दाम बोलावले. माझ्याजवळ रहा. आलास फार चांगले केलेस. तुझ्यात माणुसकी आहे.नाहीतर तो, तो हरामखोर( नाव देत नाही.) तुझ्या अगोदर फोन केला तर म्हणतो कसा," कोण बाबू ?कोण ड्रायव्हर ? मी त्याला ओळखत नाही मी येणार नाही." असले बोलणे शोभते का ? आमच्या बाबूने हजार वेळा तरी मोटारने याला घरी पोचवले असेल ! त्याची जाणीव नाही, कृतज्ञता नाही. उद्या हा मेला तर याला कुणी खांदा देईल का ?" स्मशानातील बाकावर आम्ही चारपाच जण बसलो होतो. अत्र्यांचा उद्धार चालू होता. ती ती पदे फिरून येत होती. अग्नी देण्याची वेळ आली. अत्रे ताडकन उठले आणि म्हणाले, "मी भाषण करणार." आम्ही घाबरलो आणि म्हणालो, "भाषण कशाला करता ? इथेच बसा." कारण डोक्यात भलताच विषय बसला होता. भाषण करताना त्यालाच सरणावर ओढले तर घ्या काय ? "बाबूबद्दल मला बोललेच पाहिजे. नाहीतर तो देवाघरी गुन्हा होईल." जवळ जवळ पंधरा मिनिटे अत्र्यांनी भाषण केले. साध्याही विषयात मोठा आशय कसा आढळतो आणि माणुसकीचा तसाच कृतज्ञतेचा गहिवर म्हणजे काय, याचे ते भाषण म्हणजे आदर्श नमुनाच होते. भाषण ऐकताना प्रत्येकाचे डोळे पाणावले होते.

दुसरे दिवशी सकाळी मराठा उघडला. बाबू ड्रायव्हरवर अग्रलेख होता. त्यातला प्रत्येक शब्द मी स्मशानात ऐकला होता. स्मशानात येण्यापूर्वी अत्रे अग्रलेख लिहून आले होते. आणि तोच अग्रलेख त्यांनी मानावर नसतानासुद्धा अक्षरन् अक्षर म्हणून दाखविला. अत्र्यांची स्मरणशक्ती ही खरोखर अलौकिक होती. अत्र्यांनी अनेक लहान आणि महान् व्यक्तींच्यावर वाङ्मयीन दृष्टया अप्रतिम अग्रलेख लिहिले आहेत. पण बाबूवर लिहिलेल्या मृत्युलेखातील उत्कटता आणि जिव्हाळा काही वेगळाच आहे.

## अत्रे यांच्या लोकप्रियतेचे रहस्य

मी कधी कधी विचार करतो, या माणसाच्या लोकप्रियतेचे रहस्य आहे तरी कशात ? त्यांच्या मृत्यूनंतर आपल्याच कुटुंबातील एक माणूस गेले असे प्रत्येक मराठी माणसाला कां वाटले ? आणि मृत्यूनंतर एक वर्ष होऊन गेले तरी एखादी राजकीय किंवा सामाजिक घटना घडली, प्रचंड अन्याय घडला की आज अत्रे पाहिजे होते असे सहजोद्‌गार आपल्या तोंडून कां निघतात ? अत्र्यांच्यात असणाऱ्या अनेक उणीवा, अनेक मर्यादा आणि त्यांच्या हातून घडलेले अनेक अक्षम्य प्रमाद महाराष्ट्राच्या समाजपुरुषाने पोटात घातले आणि प्रेमाने, अभिमानाने आणि कृतज्ञतेने पोटाशी धरले ते कां ? अत्रे पहिल्या दर्जाचे विनोदपंडित आणि नाटककार होते. दहा हजारात नव्हे, दहा लाखात वक्ते होते. न्यायाची चाड आणि अन्यायाची चीड असणारे निर्भय संपादक होते. संयुक्त महाराष्ट्राच्या झालेल्या महायुद्धातील आघाडीचे झुंजार सेनानी होते. त्यांनी उत्कृष्ट व्यक्तिचित्रे लिहिली, उत्तम प्रस्तावना लिहिल्या पण हे सगळे असूनही एक गोष्ट जर अत्र्यांच्यात नसती तर त्यांच्या मृत्यूनंतर अवघा महाराष्ट्र दुःखाने इतका हेलावला नसता. अत्रे भल्याबुऱ्या सगळ्या अर्थाने माणूस होते. माणसाने माणसासारखे वागावे हा त्यांच्या गुरूंचा – गडकऱ्यांचा–मंत्र अत्र्यांनी आमरण आचरणात आणला. भूतदया हे माणुसकीचे सगळ्यात मोठे मांडवल. अत्रे या बाबतीत कुबेरापेक्षाही श्रीमंत होते.

खुद्द माझीच गोष्ट. आजीच्या, वडिलांच्या आणि आईच्या मृत्यूच्यावेळी अगदी शेवटपर्यंत अत्रे माझ्याबरोबर स्मशानात 'राजद्वारे स्मशाने च यः तिष्ठति सः बान्धवः' हे वचन अत्र्यांनी अक्षरशः खरे केले. पैशाची अडचण आहे का, आणखी काही गरज आहे का हे त्यांनी प्रत्येकवेळी मला पुन्हा पुन्हा विचारले. केवळ माझ्या एकट्याच्याच बाबतीत नव्हे तर असंख्यांच्या बाबतीत हेच घडत असे.

माझ्याच शेजारी एकेकाळी राहणाऱ्या गृहस्थांचा हाच अनुभव. आमच्यासारखाच त्यांचा व अत्र्यांचा उत्तम परिचय होता. गृहस्थ कारखानदार होते. काही कारणांमुळे एके दिवशी स्वारी अशी पेचात सापडली की दुसऱ्याच दिवसाच्या आत निराकरण झाले नाही तर फौजदारी खटला होऊन चारदोन वर्षे तुरुंगात खडी फोडावी लागली असती. शेवटी जिवावर उदार होऊन रात्री दोन वाजता त्यांनी अत्र्यांचा दरवाजा जोराने ठोठावला. नोकराने दार उघडले पण तो मालकांच्या खोलीत जाऊ देईना. गडबड व आरडाओरड ऐकून अत्रे उठले. शांतपणे सगळे ऐकून घेतले. पोशाख चढवला. आमचे शेजारी सदऱ्यात आणि लेंग्यातच होते. तसेच दोघे मोटारमध्ये बसले आणि थेट पुण्याला गेले. संबंधित अधिकाऱ्याला भेटले. सुदैवाने तो अधिकारी अत्र्यांचा विद्यार्थी निघाला. काम फत्ते झाले आणि दोघे दुसरे दिवशी दुपारी मुंबईस परतले. चंदनाचे खोड यापेक्षा वेगळे ते आणखी काय झिजते ? एकदा असाच दुपारी अत्र्यांच्याकडे गेलो. "तुझ्या अगोदरच एक वेडसर बाई आली होती. आल्याबरोबर बाईचा पहिला प्रश्न, "घरात घासलेट आहे का ? द्या. म्हणजे तुमच्यासमोरच पेटवून घेते आणि जीव देते." दोन तास बाईची कथा ऐकत होतो. समजूत घालीत



भारताचा नवा परराष्ट्रमंत्री






होतो. शेवटी नवऱ्याला फोन करून बोलावले. पार वैतागलो. पार जेवायला उसंत नाही. वाचायला वेळ नाही. लेखन नाही. झोप नाही. सगळे बंद करून टाकले पाहिजे." अधून मधून अत्र्यांचा असा उद्रेक होई पण जित्याची खोड जात नाही हेच खरे. माणूस लहान असो, मोठा असो, श्रीमंत असो दरिद्री असो एकदा त्याच्यावर अन्याय झाला हे पटले की त्याची दाद लावून देण्याकरिता अत्रे आपले तन मन धन पणाला लावून आकाश पाताळ एक करीत.

माणुसकीप्रमाणेच अत्र्यांनी अपरंपार प्रेम केले ते काटेरी, दगडी आणि फुलांच्या तसेच भावभक्तीच्या आणि बुद्धीच्या देशावर—महाराष्ट्रावर. "देह पडो त्वकारणी ही असे स्पृहा", असे एका लेखात अत्र्यांनी म्हटले त्यातील एकही काना किंवा मात्रा खोटी नव्हती. आणि त्यामुळेच महाराष्ट्राच्या उदार आणि रसिक जनतेने अत्र्यांच्या दुर्गुणांकडे दुर्लक्ष करून फक्त गुणांकडे बघितले आणि कौतुक केले. इंग्रज माणूस आपल्या जन्मभूमीवर जसा सर्व दोषांसह प्रेम करतो (England with all thy faults I love thee.") त्याप्रमाणे मराठी जनतेने सकल गुणदोषसंपन्न अत्रे नामे माणसावर अपरंपार प्रेम केले.

## जीवनातील सुवर्ण कालखंड

१९५५ ते १९६० हा अत्र्यांच्या एरव्हीही संपन्न असलेल्या चरित्रात सुवर्णाक्षरांनी लिहून ठेवण्याचा कालखंड आहे. 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र झालाच पाहिजे,' या घोषणेचा प्रभावी प्रचार करताना अत्र्यांच्या लेखणीचे आणि वाणीचे तेजस्वी व भव्योदात्त स्वरूप या काळात प्रकर्षाने आढळते. अत्र्यांची भाषाशैली मेणापेक्षा मऊ, वज्रापेक्षा कठोर आणि अग्नीपेक्षा दाहक बनली ती याच] काळात. या पाच वर्षात प्रल्हाद केशव अत्रे ही व्यक्ती बोलत नव्हती किंवा लिहीत नव्हती. त्यांच्या मुखाने आणि लेखणीने मराठी माणसांचे मनोगत, त्यांचा हर्ष, त्यांची निराशा, त्यांच्या आकांक्षा, त्यांचा क्रोध हा प्रगट होत होता. त्यामुळे मुंबईच्या गोळीबारात १०५ माणसे मेली व शेकडो जखमी झाली त्यावेळी भयानक, करुण आणि रौद्र रस म्हणजे काय याचा नवयुगमधून वाचकांना साक्षात्कार झाला. त्यातील अभद्र शब्दात व्यक्त केलेला तळतळाट वाचून काही सत्प्रवृत्त माणसांना फेफरे येण्याचेच तेवढे उरले. त्यांनी निषेध केला आणि सरकारने अंक जप्त केला. आक्षेपकांना उत्तर देताना अत्रे एकच सांगत, "ज्याचे मूल अन्यायाने आणि अनवधानाने गोळी लागून मेले त्याच्या आईला, बापाला काय वाटेल, ते कोणत्या शब्दात बोलतील, ते मी लिहिले आहे. दुःखाने रडणाऱ्या आणि संतापाने कचाकचा शिव्या देणाऱ्या आईला किंवा बहिणीला औचित्य शिकविणे हे अप्रयोजक आहे." या काळात अत्रे आणि मराठी माणूस या दोघात अद्वैत निर्माण झाले. ह्याच काळात अत्रे हे प्रासाच्या आणि शब्दांच्या काव्यापलीकडे गेले. आणि गोविंदाग्रजांच्या शब्दात सांगायचे म्हणजे संयुक्त महाराष्ट्र निर्मितीसाठी झिजत, झटत आणि झगडत असताना जित्या जिवाचे जगणे जगले. या काळात हा हसणारा सिंह आपल्या अमोघ लेखणीने आणि वाणीने जनतेच्या अंतःकरणातील स्वाभिमानाचा अग्नी चेतवीत होता. त्यावेळच्या शिवाजीपार्कवरील प्रचंड सभा, तेथील ती मुलुख मैदानी आणि मर्दानी भाषणे, 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र झालाच पाहिजे' या गगनभेदी गर्जना आणि घोषणा यांची आठवण झाली की सर्वांगावर रोमांच उभे राहतात आणि त्यात होणारी अत्र्यांची भाषणे—त्याचे वर्णन करण्यास शब्द बापुडे, दुबळे ठरतात ! अत्र्यांचे भाषण आणि राष्ट्रगीत हे शेवटी असत. एस्. एम्. जोशी, डांगे, सरदेसाई, नाना पाटील असे एकापेक्षा एक अतिरथी महारथी नेते व वक्ते होते. पण अत्रे ते अत्रे, तिथे तुलना नाही. पर्वताप्रमाणे प्रचंड असे अत्रे, विठोबाप्रमाणे कमरेवर हात ठेवून भाषण करण्यास उभे राहिले की लाखो लोकांचे पंचप्राण डोळ्यात व कानात गोळा होत. त्यांच्या भाषणात काय नव्हते ? काव्य होते,नाट्य होते, हास्य होते, कारुण्य होते, उपहास होता, उपरोध होता, क्रोध होता आणि या सगळ्यांना प्रगट करणारा अपूर्व भाषाविलासही होता. एक भाषण मला विशेष आठवते. मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र मिळाल्यावर समितीतील पक्षात भांडणे सुरू झाली. तिला उतरती कळा लागली. अशा एका प्रसंगी शिवाजी पार्कवर—अत्र्यांच्या शिवतीर्थावर सभा भरली होती. या शिवतीर्थाने गेल्या पाच वर्षात काय काय अपूर्व आणि नाट्यपूर्ण प्रसंग पाहिले याचे वर्णन करण्यास अत्र्यांनी सुरुवात केली आणि तेच शिवतीर्थ आता कोणता प्रसंग पाहते आहे याचे अत्र्यांनी डोळ्यांसमोर कारुण्यपूर्ण आणि काव्यपूर्ण चित्र उभे केले.

## सूडाची फिट्टंफाट

अत्र्यांनी या काळात जशा अनेक सभा गाजवल्या त्याचप्रमाणे एक दोन सभा त्यांनी पार मोडल्या. तेही दृश्य चित्तथरारक होते. शंकरराव देव, काकासाहेब गाडगीळ, नानासाहेब कुंटे अशा नामांकीत काँग्रेस पुढाऱ्यांच्या प्रचंड सभेवर अत्र्यांनी लाखो लोकांसमवेत

गृह

गृहमंत्रीपद !

घाड घातली. आवाज चिंब बसला होता. सकाळीच संयुक्त महाराष्ट्र समितीच्या बहुतेक पुढाऱ्यांची धरपकड झाल्यामुळे लोक प्रक्षुब्ध झाले होते. आपल्या पार बसलेल्या आवाजात अत्र्यांनी भाषण केले आणि कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांना पार हाकलून दिले.

पण खरी मजा यापुढची आहे. या सभामोडीच्या प्रसंगी मी अत्र्यांच्याच जवळ उभा होतो. चलेजावचा कार्यक्रम संपल्यावर अत्रे म्हणाले घरी चल. आम्ही घरी गेलो. इकडे तिकडे बोलल्यावर अत्रे एकदम म्हणाले, "मला आज फार आनंद झाला. या काका गाडगीळांनी मला मंडईत बोलू दिले नाही. तोंडात घेतलेला घास गिळू दिला नाही. आज काकासाहेबांना सभेत बोलू दिले नाही. पार हाकलून दिले. फिटुंफाट झाली." सार्वजनिक जीवनाच्या प्रवाहात खाजगी जीवनाचे प्रवाह सुप्तपणे कसे मिसळत व उसळत असतात ते अशा वेळी दिसते. माणूस कितीही सार्वजनिक झाला तरी तो शेवटी माणूसच असतो. वैयक्तिक हेवेदावे त्याला विसरता येत नाहीत.

संयुक्त महाराष्ट्र चळवळीतील सगळ्यात मोठा चमत्कार म्हणजे अवघ्या अठरा रुपयांच्या भांडवलावर अत्र्यांनी सुरू केलेले **मराठा** हे दैनिक !! 'वाढता वाढता वाढे भेदिले सूर्यमंडळा' या मारुती स्तोत्रातील ओळी जितक्या अत्र्यांच्या आयुष्यक्रमाला तितक्याच 'मराठया'ला लागू पडतात. अत्र्यांनी आपल्या पराक्रमी लेखणीच्या खांबावर शिवशक्तीची सोन्याची द्वारका उभी केली. काही अर्धवट, काही धूर्त, तर काही नतद्रष्ट माणसे "लोकांनी रोटरी फंडाकरिता लाखावर रुपये दिले म्हणून मराठा वृत्तपत्र निघाले आणि भरभराटीला आले. अत्र्यांनी या पैशाचा अपहार केला," असा आरडाओरडा करतात. पण लोकांची कदर आणि आदर करणारा व त्याचवेळी प्रतिपक्षीयांना व राज्यकर्त्यांना कर्दनकाळ वाटणारा असा मराठा निर्माण करणारे अत्र्यांच्या कर्तृत्वाचे मोल लक्षावधी रुपयांनी होणारे नाही. रोटरी निधीला ज्यांनी मदत केली त्यापैकी एकाही माणसाची तक्रार नाही. एकंदरीत मराठी माणसाची जात ही खेकडयाची जात आहे. आपण काहीही करावयाचे नाही आणि जो कोणी उद्योग करून आपला उत्कर्ष साधेल त्याचे पाय तत्त्वनिष्ठ दृष्टीने ओढत रहावयाचे. एखादा विद्वान, एखादा देशभक्त दारिद्र्यात मरण पावला की आम्हाला एक प्रकारचे आध्यात्मिक समाधान लाभते.

अत्र्यांनी कोणाचाही कधीही हेवा केला नाही. आणि दाव्याशिवाय त्यांचा एकही दिवस गेला नाही. (अत्रे मृत्यू पावल्यामुळे त्यांच्यावर असणारे चार दावे कोर्टाने काढून टाकल्याचे नुक्तेच वाचले) गुणांचा असा महापूजक महाराष्ट्रात कित्येक वर्षांत झाला नाही. लेखक असो, देशभक्त असो, मल्ल असो, गायक असो, नट असो नाहीतर जयंत नारळीकरांसारखा एखादा गणिती असो दिव्यत्वाची प्रचीती आली की या उदारमनस्क माणसाचे पराक्रमी हात आपोआप जुळत. त्यांच्या स्तुतीने मराठयाचे रकाने तुडुंब भरून वाहू लागत.







अत्रे जन्मजात विभूतिपूजक होते. कधी कधी त्यांच्या स्तुतीत देखणेपणा कमी असे. एखादा हजार दीड हजार पृष्ठांचा ग्रंथ पाहिला की त्या ग्रंथाचा कर्ता महाविद्वान असला पाहिजे याबद्दल त्यांची १०१ टक्के खात्री असे. एखादे औषध असो, एखादा उपचार असो, एखादे नाटक असो, नाहीतर पक्षाचा पुढारी असो अत्रे त्यांच्या प्रथमदर्शनी प्रेमात नुसते पडत नसत तर सपशेल कोसळत असत. जो भेटेल त्याच्यासमोर. त्या विषयावर अत्र्यांचे महाभाष्य चालू असे. एकदा तो झटका गेला की अत्र्यांची विवेचक शक्ती जागृत होई आणि मग उत्तर ध्रुवावरून दक्षिण ध्रुवावर उडी मारण्यास वेळ लागत नसे. त्यात विसंगती दिसे पण प्रांजळपणाही तितकाच असे. अत्र्यांना आकर्षण तत्त्वापेक्षा किंवा विचारापेक्षा व्यक्तीचे असे. गांधी आणि नेहरू म्हणजे कॉंग्रेस, विनोबा भावे म्हणजे सर्वोदय, समाजवादी पक्ष म्हणजे जयप्रकाश नारायण, अच्युतराव पटवर्धन आणि एस्. एम्. जोशी, कम्युनिस्ट पक्ष म्हणजे डांगे आणि हिंदुसभा म्हणजे स्वातंत्र्यवीर सावरकर हे त्यांचे भोळेभाबडे गणित असे. काही कारणाने एखादी व्यक्ती मर्जीतून उतरली की त्या पक्षाचे श्राद्ध झालेच म्हणून समजा. मग विनोबांचा वानरोबा होण्यास वेळ लागत नसे. अत्रे प्रभावपूजक होते, पण दुटप्पी नव्हते.

## अत्रे यांची महान श्रद्धास्थाने

काही श्रद्धास्थाने अत्र्यांच्या अंतःकरणात चिरंतन होती. गडकरी, रँगलर परांजपे, काकासाहेब लिमये अशा व्यक्तींच्याबद्दल त्यांना परमादर होता. यांच्याविरुद्ध ते एक अवाक्षरही बोलत नसत आणि दुसऱ्या कोणीही अशी टीका केली तर हा परमभक्त त्याचा तात्काल वाङ्मयीन शिरच्छेद करी. अत्र्यांच्या मृत्यूपूर्वी काही महिने माडखोलकरांनी हिराबाई पेडणेकरांच्यावर माहितीपूर्ण व अभ्यासपूर्ण लेख लिहिले होते. त्यात त्यांनी आपल्या दिवंगत गुरूच्याविषयी —श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांच्याविषयी—अनेक वादग्रस्त व बदनामीकारक विधाने केली होती. लेख वाचताच अत्र्यांचे पित्त खवळले. वास्तविक कोल्हटकर हे गडकऱ्यांचे म्हणजे त्यांच्या गुरूंचे गुरू. पण एकदा गुरू म्हणून मान्य केल्यावर व आजन्म त्याचा डांगोरा पिटल्यावर, गुरूच्या देहावसानानंतर त्याची बदनामी करणे, मग ती कितीही खरी असो अत्र्यांना आवडले नाही आणि आपल्या नेहमीच्या पद्धतीने त्यांनी म्याडोबा माडखोलकरांना अक्षरशः झोडपून काढले. रँगलर परांजपे यांचे निकटचे व रक्ताचे नाते असणाऱ्या एका आप्तांनी अप्पासाहेबांच्या पहिल्या पुण्यतिथीनंतर त्यांची अवहेलना करणारे पत्र त्यांना लिहिले होते. हे गृहस्थ माझेही नातलग असल्यामुळे अत्र्यांनी माझ्याजवळ त्यांच्यासंबंधी व्यक्त केलेला क्रोध मी कधीही विसणार नाही. पुढे चार आठ दिवस त्या आठवणीमुळे स्वारी नुसती धुमसत होती.

अत्र्यांचे सगळ्यात मोठे आणि अढळ श्रद्धास्थान म्हणजे खुद्द अत्रेच होते. त्याला थोडासुद्धा धक्का लागला की अत्रे अस्वस्थ होत आणि खवळून उठत. प्रांजळ मतभेद, तात्त्विक वादविवाद वगैरे गोष्टी अत्र्यांच्या गावी नव्हत्या. वंदे मातरम् या नाटकातील एक पात्र म्हणते, "माझे कुणी बोट दाबले तर मी त्याचा गळा दाबीन." अत्र्यांची वृत्ती थोडी फार अशीच —'उसने ठेवू नयेचि फेडावे'— अशी होती. ही फेड अनेकदा चक्रवाढ व्याजाने केलेली असे. अत्र्यांना चार समजुतीच्या गोष्टी सांगणारे व संपूर्ण सत्य समोर मांडणारे महाभाग हाताच्या बोटावर मोजता येतील इतके असतील किंवा नसतील. कोणी कसाही का विरोध करीना त्याचा ठेचा झालाच म्हणून समजावे. नाकतोड्या टीकाकार, शेंबडा आणि नकटा कवि, अबू मेंदूचा मधू अशा शीर्षकांची सहस्र नामावली देता येईल. अगदी काहीच सुचले नाही तर हरामखोर म्हणून अत्रे पदवीदान समारंभ पुरा करीत. "हे पहा चौदा हरामखोर" हा लेख लिहिल्यामुळे पुणे नगरपालिकेच्या चौदा सभासदांनी स्वतंत्रपणे अत्र्यांवर चौदा फिर्यादी ठोकल्या होत्या. याला दुसरी बाजू होती. अत्रे हे कमालीचे आत्मप्रदर्शक आणि आत्मपूजक असल्यामुळे त्यांच्याबद्दल कोठे चार ओळी चांगल्या आल्या की मराठ्यात चौकटीच्या मखरात त्यांना बसवलेच म्हणून समजावे. त्यात कसलाच पंक्तिप्रपंच नसे. स्तुती करणारी बडी असामी असो किंवा वृद्ध्रुक माणूस असो अत्रे [illegible] निहायत खूष असत. या बाबतीत अत्रे लहानपणी लाडावलेल्या मुलासारखे होते. जगाने आपले कौतुक केले पाहिजे, जगाचे आपण केंद्रबिंदू असले पाहिजे, आपण केलेल्या प्रत्येक कृत्याबद्दल, उच्चारलेल्या शब्दाबद्दल आणि लिहिलेल्या स्वल्पविरामाबद्दल समाजाने आपल्यास हार्दिक दाद दिली पाहिजे अशी अत्र्यांची प्रांजळ धारणा



अनुक्रमणिका







आणि प्रयत्न होता. खुर्ची असो, पुस्तक असो, नवीन लिहिलेला लेख किंवा नाटक असो, फिरता रंगमंच असो किंवा खंडाळयाच्या राज-मार्गावरील एखादे आंब्याचे किंवा फणसाचे झाड असो किंवा वेडा-वाकडा दगड असो त्याचे प्रत्येकासमोर प्रदर्शन करण्याचा अत्र्यांना विलक्षण हव्यास होता. अत्र्यांच्या वाणीचा यापैकी कशालाही स्पर्श झाला की त्याला अनादि अनंताचे अलौकिकत्व आणि अद्वितीयत्व प्राप्त होई. भाषाच मुळी–असा माणूस, अशी कविता, असे नाटक, असा लेख, असा कुत्रा दहा हजार वर्षांत झाला नाही व पुढे दहा हजार वर्षे होणार नाही–अशी अतिशयोक्तीची अतिशयोक्ती करणारी असे.

अत्र्यांचे वादविवाद तंत्र किंवा टीकापद्धती मजेदार होती. वास्तविक तर्कशुद्ध विवेचन व विवाद करण्याचे सामर्थ्य त्यांच्या बुद्धीत आणि प्रतिमेत निश्चित होते. संयुक्त महाराष्ट्राच्या चळ-वळीच्या वेळी लिहिलेले अनेक लेख, रामदासांच्यावर लिहिलेले अलिकडले लेख याची साक्ष देतील. पण अत्र्यांना मुद्यांवरून गुद्यांवर येण्याची फार हौस आणि उत्साह. परत हे गुद्दे देताना धर्मयुद्धाचे कायदेकानू पाळतील असेही नाही. गोल्डस्मिथने डॉ. जॉन्सनबद्दल म्हटले आहे की झाडलेल्या गोळीचा नेम चुकला की डॉ. जॉन्सन आपल्या प्रतिपक्षाच्या टाळक्यात ते पिस्तूलच हाणतो. अत्र्यांचा प्रकार असाच होता. अत्र्यांच्याकडे दोन प्रकारचे दारूगोळे जय्यत तयार असत. काही काळ युक्तिवाद आणि वादविवाद वगैरे अहिंसात्मक व अळणी युद्ध करावयाचे. ते जमले नाही की त्या व्यक्तीबद्दल अव-गत असणाऱ्या भानगडींचे ब्रह्मास्त्र सोडावयाचे. संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनाच्या वेळी अग्रलेखांमधून मतभेद प्रगट करणाऱ्या व अत्र्यांना विरोध करणाऱ्या एका प्रख्यात संपादकाचा त्यांनी वरील तंत्राचा वापर करून पार विचलेला पावा करून टाकला होता. अत्र्यांनी उघड उघड धमकी दिली की यापुढे एक अक्षर आमच्याविरुद्ध आणि संयुक्त महाराष्ट्राच्याविरुद्ध लिहाल तर ती तुमची भयंकर भानगड बाहेर काढीन. बिचारा संपादक तोंडात मिठाची गुळणी घेऊन गप्प बसला. या संपादकाप्रमाणेच अनेक साहित्यिकांना आणि राजकीय पुढाऱ्यांना अत्र्यांचे हे खाजगी कुलंगडी काढणारे पसायदान मिळाले होते. अशा प्रकारे चारित्र्यहनन झाल्यावर कोणताही सभ्य आणि सुसंस्कृत माणूस रागावलाच पाहिजे. अत्र्यांच्या वैयक्तिक टीकेचा विषय झालेली माणसे प्रथम रागावत, नाही असे नाही, अत्र्यांच्याच शब्दात त्यांना प्रतिअहेर करण्याचा प्रयत्न करीत. पण कालांतराने कंकण-नूपुर न्यायाचा अवलंब करून अत्र्यांच्याबरोबर मिळतेजुळते घेत (याला अपवाद पु. भा. भावे व ठाकरे) याचे सगळयात मोठे, अत्र्यांच्या शब्दात प्रचंड उदाहरण म्हणजे अत्रे व फडके यांचे 'खडाष्टक' नाटक संपून 'प्रीतिसंगम' नाटकाच्या प्रयोगाला झालेला प्रारंभ. अनेक वर्षे गाजलेल्या अत्रे-फडके वादात अत्र्यांनी फडक्यांची फाटकी चिंधी म्हणून शिल्लक ठेवली नाही. फडक्यांची त्याच नाण्यात परतफेड केली होती. या सगळ्या वादात कमळाबाई फडक्यांचाही साग्रसंगीत उद्धार झाला होता. अशी वस्तुस्थिती असताना उभय-तांनी एकत्र येऊन शेवटचा दिस गोड केला याबद्दल काय म्हणावे तेच कळत नाही ! !

## विसंगती खऱ्या, पण चित्ताकर्षक

अत्र्यांच्या दैनंदिन वागण्यात आणि वक्तव्यात तसेच लेखनात ज्या विसंगती प्रगट होत त्या फारच चित्ताकर्षक असत. अंगात असणाऱ्या अलौकिक गुणांच्या प्रमाणेच या अफाट विसंगतींमुळे अत्र्यांचे व्यक्तिमत्व हे विलक्षण विलोभनीय झाले होते. दारू आणि दारा या संदर्भात अत्र्यांबद्दल सूज्ञांस अधिक सांगणे नलगे. एकदा चित्रपटातील व नाटकातील नटांचा विषय निघाला. "बहुतेक नट हरामखोर आणि व्यसनी असतात. अहो, अहोरात्र दारू पितात." आपण त्या गावचे नाही असा निष्पाप चेहरा करून अत्रे त्वेषाने बोलत होते आणि श्रोते या महापुरुषाकडे कौतुकाने बघत होते. सुमारे दीडदोन वर्षांपूर्वी मुंबापुरस्थ एक प्रसिद्ध कायदेपंडित व समाजवादी पुढारी मृत्यू पावले, त्यांची गोष्ट. बरीच वर्षे झाली. वरळीच्या रस्त्यावर अत्रे मोटर चालवीत होते व शेजारीच वन-मालाबाई बसल्या होत्या. पुढची मोटर या पुढारी महाशयांची होती व त्यांच्याजवळ एक बाई बसली होती. अत्रे एकदम उद्गारले, "घरी चांगली रूपवान आणि गुणवान बायको आहे पण तिला टाकून हा चोर असा शेण खात हिंडत असतो." इतरांच्या नैतिक अधःपाता-मुळे अत्र्यांचा होणारा सात्विक संताप हा त्यातील विसंगतीमुळे फार नाट्यपूर्ण वाटे. पहिल्या पत्नीच्या मृत्यूनंतर दहा पंधरा दिव-सांच्या आत काकासाहेब गाडगीळांनी दुसरे लग्न केले. आणि पुढ-च्याच नवयुगच्या अंकात 'काका, काका, काय केलेत ?' म्हणून हॅम्लेट नाटकातील अवतरण देऊन अत्र्यांनी हुंबरडा फोडला. आता इतके दुःख करण्याचा अत्र्यांना अधिकार व कारण होते का ? पण इतका विचार केला तर ते अत्रे कसले ?

एकदा अत्र्यांच्या प्रकाशकांना, परचुऱ्यांना मी गंमतीने म्हणालो, "अत्र्यांच्या उतान्यांचे एक 'शिव्या आणि ओव्या' नावाचे पुस्तक काढूया. एकाच व्यक्तीला दिलेल्या शिव्या व त्याच्या गायिलेल्या ओव्या समोरासमोर छापावयाच्या. गांधी, नेहरू, केळकर, सावरकर, विनोबा भावे, नावे घ्यावीत तेवढी थोडीच होतील." परचुरे म्हणाले, "सगळे खरे आहे. पुस्तकाचा जबरदस्त खप होईल पण त्याअगोदर साहेब मराठ्याचा खास अंक काढून आपल्याला खपवतील, त्याचे काय."

'प्रसंगी अखंडीत वाचीत जावें' आणि 'दिसामाजि काही तरी तें लिहावें' ह्या रामदासांच्या दोन वचनांवर अत्र्यांची अपरंपार श्रद्धा होती ! उत्साहाने वाचणारा आणि उत्साहाने लिहिणारा अत्र्यांसारखा वाचक व लेखक मी पाहिलाच नाही. अत्र्यांना पुस्त-कांचा जबरदस्त हव्यास होता. कपाटे भरून ठेवलेली पुस्तके अत्रे अभिमानाने सर्वांना दाखवीत. माझ्यासारखी पुस्तके तुम्हांला कोणत्याही मराठी लेखकाजवळ किंवा संपादकाजवळ मिळणार नाहीत असे ते आत्मविश्वासाने सांगत.

[ पान ५६ वर पहा ]






## तुमच्या मुलीचें भवितव्य तुमच्याच हातीं

पुढील अनिश्चिततेपासून तिच्या
रक्षणाची तरतूद
करा. स्टेट बँकेत नियमित बचत करा.

**सेवेसाठी स्टेट बँक**

Alyars S. 273 MR












# सुप्रिया

**: कथासूत्र :** 'दीपावली'च्या जुलै अंकापासून सुरू झालेल्या या बहारदार कादंबरीची ही पुढील तीन रंगदार प्रकरणे .... मॉडेल म्हणून काम करणाऱ्या सुप्रिया या सुंदर तरुणीच्या तिनेच अगदी स्पष्ट शब्दात सांगितलेल्या कहाणीचा प्रारंभ तिने आपण एका सामान्य शोफरच्या प्रेमात कसे सापडलो आणि आईचा त्याला कसा विरोध झाला त्यापासूनच केला आहे .. आता पुढील कहाणी वाचा. .



[३]

राजेशचा मालक परदेशी गेला होता. आणि मालकीण काही दिवस गावी गेली होती. राजेशला यामुळे काहीच काम नव्हते. त्याने आपल्या मालकाचा बंगला पाहण्याची भुणभूण माझ्यामागे लावली होतो. मलाही मलबार हीलसारख्या ठिकाणी असलेला तो बंगला पाहण्याची इच्छा होतीच. पण ती त्याच्या मालकाचा बंगला म्हणून नव्हे, तर एका वेगळ्या जगात मला प्रवेश करायचा म्हणून ! मी राजेश बरोबर जायचं कबूल केलं.

"खरं म्हटलं तर मी यायला नको होतं." मी राजेशबरोबर गाडीत बसत म्हणाले, "आपण जास्तवेळ तिथं रहायचं नाही हं !"

"बंगला पाहून झाला की आपण निघूच."

नारायण दाभोळकर रोडवरील एका टोकाला असलेला तो एकमजली बंगला सभोवतालच्या गगनचुंबी इमारतीत अगदी उठून दिसत होता. मी एका नव्या जगात प्रवेश केला होता. मला त्या जगात कायम रहायचंय हा विचार माझ्या मनात होता. पण याचवेळी, मी ज्या ठिकाणी रहात होते, ती वस्ती आठवली.







"मी इथं येण्यात मोठी चूक केली." राजेशला मी म्हणाले,

'का ? आपण इथे जास्त वेळ रहायचं नाही. तू घाबरू नकोस."

माझ्या म्हणण्याचा अर्थ तुला कळला नाही; आता मला माझ्या घराची आणि शेजाऱ्यांची लाज वाटेल."

"बरोबर आहे." तो निःश्वास सोडत म्हणाला, "तू श्रीमंत घरी जन्माला यायला हवी होतीस. फक्त श्रीमंतच इथे राहू शकतात."

बंगल्याच्या आत शिरताच मी तर विस्मयचकित झाले. जमिनीवर सगळीकडे उंची गालिचा अंथरलेला होता. माझ्या पायांची घाण लागू नये आणि आवाज येऊ नये म्हणून मी पायाच्या टाचांवर चालत होते. राजेश माझ्याकडे पाहून हसत होता.

आम्ही बैठकीच्या खोलीत गेलो. सुंदर फर्निचर आणि पडद्यांनी ती खोली सजवली होती. डायनिंग रूममध्ये उंची ओव्हलच्या लाकडाचं डायनिंग टेबल व खुर्च्या मांडल्या होत्या. दुसऱ्या एका खाजगी बैठकीच्या खोलीत उत्तम परदेशी मद्याच्या बाटल्या रांगेने मांडून ठेवल्या होत्या. पहिल्या मजल्यावर दोन बेडरुम होत्या. त्यातील पलंग पाहून मी तर गारच झाले. माझ्या आयुष्यात मी प्रथमच अशा सुंदर घरात प्रवेश करत होते. ह्या घरातल्या संगमरवरीच्या भिंती आणि फर्निचरची माझ्या घरच्या काळपटलेल्या भिंतीशी आणि मोडक्या फर्निचरशी तुलनाच करू शकत नव्हते. पैशाविना ह्या जगात काही नाही, असं माझी आई नेहमी म्हणते, तेच खरं आहे असं मी माझ्या मनाला समजावले. ह्या सुंदर घरात राहणारी माणसं मनाने सुंदर असली पाहिजेत, शांत असली पाहिजेत, आमच्या चाळीत दिसणारा मांडणतंटा इथे दिसणं शक्यच नाही !

बंगल्यातल्या दैनंदिन जीवनाची माहिती राजेश मला शंभराव्या वेळी समजावून सांगत होता. त्याच्या बोलण्यात प्रौढी होती. जसा काही तोच ह्या साऱ्या झगझगाटात न्हाऊन निघाला होता. "ही माणसं नेहमी उंची किंमती काचेच्या प्लेटस्‌मध्ये जेवण घेतात. लंच आणि डीनर नेहमी सात कोर्सचं असतं. जेवणानंतर तीन प्रकारची मद्यं पितात. मालकीण जेवणाच्या वेळी मोठ्या गळ्याचा ब्लाऊज घालते. मालक डिनरसूट घालतो. यांच्याकडे नेहमीच पाहुणे असतात. कधी दोन तर कधी चार. मालकीणीच्या गळ्यात मोत्याच्या कंठा आहे. त्यांत एक मोठा हिरा आणि लाखो रुपयांचे दुसरे किंमती खडे आहेत."

"तू हे सारं मला केव्हांच सांगितलं आहेस.' मी त्याला मध्येच थांबवलं.

त्याने माझ्याकडे लक्ष दिलं नाही. त्याची तबकडी चालू होती. "मालकीण केव्हाच सैंपाकघरात जात नाही. फोन करून नोकरांना ऑर्डर्स देते. सैंपाकघरातील साऱ्या गोष्टी विजेवर चालतात. कित्येक लोकांच्या झोपायच्या खोलीपेक्षा आमचं सैंपाकघर स्वच्छ असतं. इतकंच कशाला माझ्या मालकिणीचा कुत्रा कित्येक लोकांपेक्षा स्वच्छ आहे." तो आपल्या मालकाबद्दल गर्वाने बोलत होता. गरीब माणसाबद्दल तुसडेपणा होता. माझ्या राहणीची त्याच्या मालकाच्या राहणीशी तुलना करीत असल्याने मला तो तुसडेपणा जास्तच वाटत होता.

**लेखक व छायाचित्रकार**

**पुरुषोत्तम बावकर**

आम्ही जिन्यावरनं पहिल्या मजल्यावर गेलो तेव्हा राजेशने माझ्या कटीभोवती हात धरून मला घट्ट जवळ पकडलं होतं. त्यावेळी मी या घराची मालकीण असून कोणतातरी कार्यक्रम आटोपून घरी पळतोय आणि नवऱ्याबरोबर शय्यासुख घेण्यासाठी खोलीत जात आहे असं मला वाटू लागलं. माझ्या मनातलं ओळखल्याप्रमाणे, राजेश म्हणाला, "चल आपण आज एकत्र झोपू." मी ह्यावर हसले पण मनात हे खरं व्हावं अशीच याचना केली.

त्या दिवशी मी घातलेले कपडे काही अगदीच खराब नव्हते. माझी सलवार-कमीज आईनेच शिवली होती. मला वाटलं होतं त्या कपड्यात मी स्मार्ट दिसते. पण जेव्हा राजेशच्या मालकीणीच्या खोलीतल्या आरशात पाहिले तेव्हा माझे कपडे किती गबाळे आहेत आणि मी किती बेंधळी दिसते. याची मला कल्पना आली. मला रडूच येऊ लागलं तशाच अवस्थेत मी बिछान्यावर बसले.

माझा हात हातात घेत, माझ्याजवळ बसत मला राजेशने विचारले, "काय झालं ?"

"काही नाही. ओबडधोबड घातलेल्या माझ्या वहिणीकडे पहात होते."

"कुठे आहे ती ?"

मी आरशात पडलेल्या प्रतिबिंबाकडे बोट दाखवलं. तो समजायचं ते समजला. माझ्या दुःखाची त्याला कल्पना आली. "आरशात पाहू नकोस". माझ्या भोवती हाताचा विळखा घालत तो म्हणाला, मी नाराज झाल्याने, सगळा प्लॅन फिसकटेल की काय अशी त्याला भीती वाटली. आम्ही दोघांनी एक एक चुंबन घेतलं आणि मग धीर आला. मी कुणावर तरी प्रेम करते आणि माझ्यावर कुणाचं तरी प्रेम आहे, याची मला प्रथमच जाणीव झाली; पण मा मग राजेशने जेव्हा मला संगमरवरी फरशांची बाथरुम दाखवली, त्याच्या मालकिणीचं कपड्यानी भरलेलं कपाट दाखवलं, तेव्हा पुन्हा माझं धैर्य खचलं.

"हे सगळे कपडे मला तू कां दाखवलेस ?"

"तू ते पहायला उत्सुक असशील म्हणून !"

"मला त्याचं मुळीच आकर्षण नाही." असं म्हणताच त्याचे डोळे चमकले. "मला तुझी खोली पहायचीय."

"ती तळमजल्यावर आहे. जायचं तिथे ?"

मी त्याच्याकडे थंड नजरेने पाहिले. "मला फसवण्याचा प्रयत्न तू का करतोयस ?"

"पण . . . मी . . ."

"माझ्यापेक्षा तुला जास्त माहीत आहे. आपण इथं तुझ्या मालकिणीचे कपडे पहायला आलो नाही. तुझ्या खोलीत जाऊन आपल्याला प्रेम करायचंय. मग चल उशीर नको."

मी इतकी धीट केव्हा आणि कशी झाले, याचंच मला आश्चर्य वाटलं. आम्ही खाली उतरू लागलो. राजेशने माझ्या कमरेभोवती हात टाकला आणि पायऱ्या उतरता उतरता तो मला चुंबू लागला. खाली काळोख पसरला होता. आम्ही खोलीत शिरलो. राजेशने दरवाजा बंद केला. आणि चुंबन घेत आम्ही तिथे उभे राहिलो. कधीही न संपणारं ते चुंबन होतं. प्रत्येक वेळी मला थांबावसं वाटत असताना त्याचं संपत नव्हतं आणि त्याला थांबावसं वाटत असताना मला पुरेसं वाटत नव्हतं. मग हळूच राजेशने मला बिछान्यावर लोटलं. मी तशीच पडून राहिले.

राजेश माझ्या कानात गुणगुणत होता. अनेक गोष्टी गोड आवाजात सांगत होता. माझ्या अंगावरचे कपडे उतरवत असताना मी विरोध करू नये, म्हणून तो हे सारं करत होता. मी विरोध करायचं काहीच कारण नव्हतं. त्याला माझं शरीर संपूर्ण अर्पण करायचं मी केव्हाच ठरवलं होतं. आता अंगावरच्या कपड्यांचा मला रागही आला होता. नग्न झाल्यावर मी राजेशच्या मालकिणीपेक्षा खूप सुंदर दिसेन असं मला वाटत होतं. ज्या क्षणाची मी गेले कित्येक दिवस वाट पहात होते, तो क्षण आला होता.

त्या काळोखात राजेश माझ्या शरीराच्या प्रत्येक अवयवाचे चुंबन घेत होता. मी संपूर्ण पेटते केव्हा याची तो वाट बघत होता. मी पेटले होते. आसक्तीने मी त्याला जास्तच जवळ ओढले.

शरीरसुखाचे आकंठ सेवन झाल्यावर आमची तृप्ती झाली. तसं शरीर गळून गेलं. घसा कोरडा पडला. माझा उपभोग घेतल्यावर राजेश माझ्याशी आता लग्न करणार नाही या विचाराने मी घाबरून गेले. त्याच्याशी लग्नाच्या गोष्टी बोलू लागले.

राजेशच्या मालकिणीच्या बंगल्याचे प्रतिबिंब माझ्या मनात उमटले होते. पण असा सुंदर बंगला माझ्या नशिबात नाही हे केव्हाच मला ठाऊक होतं. मला दोन खोल्या मिळाल्या तरी चालतील. पण त्या स्वच्छ नीट नेटक्या असाव्यात, जमिनीवरच्या लादीत चेहरा दिसावा इतकी ती स्वच्छ असावी, मी राजेशला समजावत होते. "माझ्या आईवरून तू माझी कल्पना करू नकोस, तिला वेळच नसतो पण मी माझं घर कसं लख्ख ठेवीन."

"माझ्या मालकिणीला जरासुद्धा घाण आवडत नाही. फरशीवरचा डाग पुसण्यासाठी मोलकरणीला ती पायाच्या बोटावर चालायला लावते, अन् तो डाग पुसून टाकते."

तुझ्या मालकिणीपेक्षा माझं घर स्वच्छ आणि सुंदर असेल. तू पाहशीलच."

"तू मॉडेलींग करणार, मग घरात पहायला तुला वेळ कुठं मिळणार ?" तो मला खिजवत म्हणाला.

"मॉडेल ! मुळीच नाही. सारा दिवस मी घरीच राहणार आहे. तुझ्यासाठी जेवण करणार. तुझी सेवा करणार. आई म्हणते की मी तुझी मोलकरीण म्हणून राहणार. काही हरकत नाही. तू जर माझ्यावर प्रेम करशील तर तुझी मोलकरीण व्हायला माझी तयारी आहे."

आम्ही कितीतरी वेळ गप्पा मारत होतो. राजेश मी सांगितलेल्या कोणत्याही गोष्टीला विरोध करत नव्हता. प्रत्येक गोष्टीत रस घेत होता. तो जरी त्यावेळी खोटं खोटं वागत होता तरी त्याच्या चेहऱ्यावर खोटेपणाची मुळीच लक्षणं नव्हती. स्वतःच्या खोटेपणातच तो मश्गुल होता.

अशाच तऱ्हेने एकदोन तास गप्पा मारल्यावर मला झोप आली. राजेश पण झोपला. मला जेव्हा जाग आली तेव्हा रात्र झाली होती. माझी आई आता काय करील याचा नेम नव्हता. मी तर घाबरून गेले. कपडे करता करता मला रडूच कोसळले.

"काय झालं ?" राजेश चमकून जागा झाला.

"इतकी रात्र मी केव्हाच बाहेर राहिले नाही. सायंकाळची बाहेर सुद्धा जात नाही मी."

"आईला सांग, मोटरमधून बाहेर फिरायला गेलो होतो. वाटेत मोटर विघडली. त्यामुळे वेळ झाला."

"ती विश्वास ठेवणार नाही."

राजेशने मला घरी पोचवलं. गाडी बंद पडल्याचं कारण मी आईला सांगणार होते. पण आम्ही जे काही कर्म केलं होतं, त्याची जाणीव आईला झाली याची कल्पना सुद्धा आली नाही. माझ्याकडे दरवाज्याची किल्ली होती. मी हळूच दरवाजा उघडला. आत संपूर्ण काळोख होता. आई गाढ झोपली असेल असं वाटलं. मी आवाज न करता माझ्या बिछान्याकडे जाऊ लागले. इतक्यात माझ्या पाठीत जोराचा धपाटा बसला. माझ्या झिज्या ओढून आईने फरफटत खोलीत नेलं. सोफ्यावर लोटून तिने मला दोन्ही हातांनी मारायला सुरुवात केली. मी प्रतिकार करायचा प्रयत्न केला. पण ते मला जमलं नाही. आईचा हात काळोखात माझ्या तोंडावर, छातीवर, सगळीकडे चालला होता. शेवटी एकदाची आई थांबली. तिला दम लागला होता. ती सोफ्यावर माझ्याशेजारीच बसली. मारामुळे माझं अंग दुखत होतं.

थोड्या वेळाने आई उठली. तिनं दिवा लावला. गिळून टाकायच्या नजरेनं ती माझ्याकडे पाहू लागली. मला शरमल्यासारखं झालं. मी कपडे सावरायचा प्रयत्न केला.

"तू इतका वेळ बाहेर कुठं होतीस आणि काय कर्म केलं आहेस ते सांग." आई नेहमीच्या आवाजात म्हणाली.

माझ्या तोंडून खरं बाहेर पडणार होतं; पण मला तिच्या माराची भीती वाटली. तिचा राग अनावर झाला असता. दिव्याच्या उजेडात तिचे बुक्के चुकवणं मला कठीण झालं असतं. आणि निळ्याकाळ्या पडलेल्या चेहऱ्याने दुसऱ्या दिवशी राजेशला भेटणे मुष्कील झालं असतं.

"आमची गाडी बिघडल्याने वेळ झाला."

"खोटं सांगू नकोस. राजेशने तुला नक्कीच भ्रष्ट केलंय."

"मुळीच नाही."

"तू आरशात पहा. तुझे डोळे कसे हिरवे झाले आहेत."

"मी आता फार दमले आहे. पण तसलं काही आम्ही केलं नाही."

"तू केलं आहेस."

"मुळीच नाही."

मला आता धीर आला होता. तिच्या मनात मला आता मारायचं नव्हतं. माझं शरीर मी राजेशला दिलंय हे समजून घेण्यामागे तिचा काहीतरी हेतू होता. ती माझ्याकडे सारखी भेदक नजरेने पहात होती. ती मला पकडण्यासाठी पुढे धावली. मी तिला प्रतिकार करायचा प्रयत्न केला.

"घाबरू नको. मी तुला मारत नाही. माझ्याबरोबर चल."

ती मला कुठे घेऊन जातेय याची मला कल्पना आली नाही. मी तिच्या बरोबर चालू लागले. तिनं माझा हात घट्ट पकडला होता. ती मला घेऊन मॅटर्निटी होमकडे निघाली. तिथं पोहोचताच मी एकदा प्रतिकार करायचा प्रयत्न केला. पण जमलं नाही. मॅटर्निटी होममध्ये एक पंचरंगेलासा डॉक्टर रात्रपाळीच्या कामावर होता.

"ही माझी मुलगी. हिला तुम्ही तपासा." आई त्या डॉक्टरला पाहून म्हणाली.

तो डॉक्टर माझ्या पोटाकडे पाहू लागला मग त्याने माझ्या चेहऱ्याकडे पाहिले आणि मग आईकडे वळून त्यानं विचारलं, "हिला काय होतंय, आणि कशासाठी तपासायचं."

"ही आपल्या यारावरोवर झोपली आहे. पण कबूल करत नाही. तू तिला तपास आणि खरं खोटं सांग."

आपला खालचा ओठ दातात दाबत गालातल्या गालात हसत डॉक्टर म्हणाला, "हा काही रोग नाही. तेव्हा ते सांगणं कठीण आहे."

"तू डॉक्टर नाहीस का ? तू पेशंटना तपासत नाहीस ?" आई त्याच्या अंगावर ओरडली.

"जरा शांत राहायला काय घेशील ?" डॉक्टर माझ्याकडे वळून म्हणाले, "तुझं नाव काय ?"

"सुप्रिया" मी लाजून म्हणाले.

"आणि समज, असं तिनं काही केलं असेल, आणि तिला त्याच्याशी लग्न करायचं असेल तर घाबरायचं कारण नाही." मला लाजलेली पाहून डॉक्टर म्हणाला.

"मी सांगितलं तेवढं कर." आई जोरात गरजली.

"बरं सुप्रिया, तुझी आई म्हणतेय, तर तपासतो मी." डॉक्टर हळुवार आवाजात म्हणाला.

मी सारा धीर एकवटून म्हणाले, "मी खरंच ते केलंय मग तर झालं ना. चल आई आपण जाऊ."












"नाही. तुला तपासल्याशिवाय नाही."

मी माझे कपडे उतरवले. आणि कॉटवर झोपले. माझं ते नग्न सौंदर्य पाहून डॉक्टरची विकेट उडाली. तो कितीतरी वेळ माझ्याकडे पहात राहिला.

"तुझं म्हणणं बरोबर आहे."मला तपासल्यावर डॉक्टर आईकडे वळून म्हणाला. पर्स काढून आईने पैसे विचारले. डॉक्टरने फी घेतली नाही.

"तुझं त्याच्यावर प्रेम आहे?" डॉक्टरने विचारले.

"अर्थातच."

"मग तुम्ही दोघे लग्न केव्हा करणार?"

"तो तिच्याशी लग्न केव्हाच करणार नाही." मी उत्तर द्यायच्या आधीच आई म्हणाली.

"लवकरच आम्ही लग्न करणार आहोत" मी म्हणाले. माझ्या डोळ्यातला तो भोळा भाव पाहून तो हसला. त्याने प्रेमाने माझ्या गालावर चापट मारली.

घरी जाताच आई माझ्यावर तोंडसुख घेईल; मला मारील असं वाटलं होतं; पण तसं काहीच घडलं नाही. तिने माझ्यासाठी खाणं केलं आणि ती बाहेर आली. मी सोफ्यावर बसून तिच्या हालचाली टिपून घेत होते. तिच्या चेहऱ्यावर कसलं तरी समाधान तरळत होतं.

"खा आता."

मला खूप भूक लागली होती. मी घाबरत खायला बसले. माझ्या पुढ्यात उकडलेली दोन अंडी आणि ग्लासभर दूध होतं. अगदीच अनपेक्षित.

"हे खूप आहे ग."

"तू खा ते सारं. तुला आता ह्याची फार गरज आहे." तिचा आवाज अगदी मृदु होता. "तुला काही खायला देण्याइतपत राजेशने तुझी काळजी घेतली नाही" त्याच आवाजाच्या पातळीत ती म्हणाली.

"आम्हाला झोप लागली." मी म्हणाले आणि मग तर खूपच उशीर झाला होता."

—मी खात असताना ती माझ्याकडे निरखून पहात होती. तिची ती नेहमीचीच सवय आहे. मला वाढायचं आणि माझं जेवण होईपर्यंत, माझ्याकडे बघत बसायचं. माझं संपलं की उरलेलं, सैंपाक घरात जाऊन खायचं. गेल्या कित्येक दिवसात तिने माझ्याबरोबर टेबलावर जेवण घेतलं नव्हतं. माझं खाऊन उरलेलं ती नेहमी खायची. माझ्यावर तिचा फार लोभ होता. आणि म्हणूनच ती माझ्यावर बारीक लक्ष देत होती.

"माझ्या हातून ते घडलं, म्हणून तू रागवलीस आहे? पण त्याने मला वचन दिलंय. आम्ही लवकरच लग्न करणार आहोत". मी थोड्या वेळाने म्हणाले.

"मी काही रागवले नाही तुझ्यावर." ती तावडतोब म्हणाली. "त्या क्षणाला माझा राग अनावर झाला होता. कारण मी संध्याकाळपासून तुझी वाट पहात होते. पण तू त्याचा विचार करू नकोस. खा आता बघू."

लहान मुलांच्या प्रश्नाला उत्तर द्यायचं नसलं की मोठी माणसं ज्याप्रमाणं समजावतात तसा तो आईचा स्वर ऐकून मला तिच्या त्या वागण्याचा संशय येऊ लागला.

"आई, तो माझ्याशी लग्न करणार यावर तुझा विश्वास बसत नाही?"

"माझा विश्वास आहे ग; पण तू खा आता उशीर झालाय."

"नाही. तुझा विश्वास नाही."

"किती बडबड करतेस तू. आता खाणार आहेस की अशीच बडबड करीत बसणार आहेस?"

"तू खरं सांगितल्याशिवाय मी बिलकूल खाणार नाही." मी खायचं थांबवलं.

—तिनं बशा गोळा केल्या आणि ती आंत गेली. ती बाहेर येईपर्यंत मी तशीच बसून राहिले. ती बाहेर येताच मी विचारले. "तुला आनंद झाला?"

"हो."

"का बरं?"

"राजेश तुझ्याशी लग्न करणार नाही याची मला खात्री पटली. आता तो तुझा नाद सोडून देईल."

"बिलकूल नाही. तो माझ्याशीच लग्न करणार आहे."

"तो तुझ्याशी लग्न करणार नाही. त्याला जे हवं होतं ते मिळालंय. तो आता तुझ्याकडे दुर्लक्ष करणार."

"असं काहीतरी वाईट बोलू नकोस आई."

"मी खरंच तेच सांगतेय. त्याला तुझ्याशी गम्मत करायची होती. तो भिकारी आहे. तो तुझ्या तोंडाला पानं पुसणार."

"म्हणूनच तुला आनंद झालाय वाटतं?"

"हो. कारण आता तुझं त्याच्याशी लग्न होणार नाही याची मला खात्री पटलीय."

"माझं वाईट व्हावं यात तुझा स्वार्थ काय?" मी दुखावलेल्या स्वरात तिला विचारलं.

"त्याला जर खरोखरीच तुझ्याशी लग्न करायचं असतं तर त्याने तुझा उपभोग घेतला नसता. राजेश तुझ्याबरोबर मजा मारून तुला सोडून देणार याबद्दल पाहिजे तर पैज मार माझ्याशी म्हणूनच मी आनंदात आहे. आणि जर का त्याने तुझ्याशी लग्न केलं तर तो तुझ्या आयुष्याचा सत्यानाश करील."

आईच्या त्या लागट बोलण्याने माझे डोळे पाणावले.

"मी सुखाचा संसार करावा असं तुला मुळीच वाटत नाही. त्या वासंतीप्रमाणे आयुष्य घालवावं अशी तुझी इच्छा आहे." वासंती ही माझ्या शेजारची मुलगी. दोन तीन लग्न मोडल्यावर तिने वेश्येचा धंदा करायला सुरुवात केली होती.

"तू सुखात रहावंस हीच माझी इच्छा आहे. म्हणून तुला इतकी लहानाची मोठी केली." ती चिडक्या स्वरात म्हणाली. तिने बशा उचलल्या आणि मोरीत जाऊन धुवू लागली. मी एकटी असल्यामुळे तिच्या त्या उत्तरावर विचार करू लागले. त्याचबरोबर राजेशने दिलेली वचनं आठवली

आणि आईचं म्हणणं खरं वाटेना. पण तिची खरं बोलण्याची सवय माहीत असल्याने माझ्या मनाचा गोंधळ उडाला.

एव्हाना आई बिछान्यावर झोपली. थोड्या वेळाने दमलेल्या आणि गळून गेलेल्या अवस्थेत मी तिच्या कुशीत जाऊन झोपले.

झालेल्या गोष्टी राजेशला सांगू नये असे ठरवले. आईने म्हटल्याप्रमाणे तो मला सोडून जाईल, अशी भीती मला वाटू लागली. स्त्रीनं पुरुषाला एकदा शरीर दिलं की त्याच्या मर्जीवर अवलंबून रहावं लागतं त्याला आपल्या मनाप्रमाणे वागवण्यासाठी कोणतीच गोष्ट तिच्याजवळ शिल्लक रहात नाही, हे मला आता प्रथमच समजलं. पण राजेश आपलं वचन पाळील, आणि त्याचे माझे संबंध अधिकच दृढ होऊ दे अशी मनातल्या मनात प्रार्थना करू लागले.

नेहमीच्या जागी आम्ही भेटताच, आपलं लग्न, पाच महिन्यानी करायचं; कारण त्यावेळी लग्नाचे मुहूर्त सुरू होणार असं तो म्हणाला.

"कालची ती गोष्ट झाल्यावर वाटलं तू मला सोडूनच जाणार."

"काय बोलतेस तू." तो दोषी नजरेने म्हणाला. "मला तू हलकट, नीच समजलीस वाटतं !"

"तसं नव्हे रे; पण कितीतरी पुरुष असं वागल्याचं माझ्या ऐकिवात आहे.

"तुझ्या ह्या बोलण्याने मला फार दु:खी केलं. याचसाठी का तू माझ्यावर प्रेमाचं नाटक करतेस ?"

"मी खरंच तुझ्यावर प्रेम करतेय; पण तू मात्र आता माझ्यावर प्रेम करणार नाहीस."

"मी तुझ्यावर प्रेम करत नाही असं काही दिसून आलं का ?"

"नाही. पण तुझा काय नेम."

"तू मला चिडवते आहेस. मी तुला तुझ्या स्टुडिओवर सोडतो तो कसा." त्याने गाडी चालू करण्याचा वहाणा केला.

मी घावरून त्याच्या गळचाला मिठी मारली.

"नको राजेश, असा रागवू नकोस माझ्यावर. मी आपलं सहजच म्हणाले."

"तुझ्या मनात होतं म्हणूनच तू म्हणालीस. याचा अर्थ, तुझं माझ्यावर प्रेम नाही."

"खरंच माझं तुझ्यावर प्रेम आहे. खरंच म्हणून तुला माझं शरीर दिलं."

"माझं प्रेम नाही वाटतं !" तो छद्मीपणे म्हणाला.

"मी तुझ्याशी खेळच खेळत होतो असं वाटलं का ?"

"पण राजेश," मी स्फुंदत म्हणाले, "मी असं काय केलंय की तू मला टाकून बोलावंस."

"काही नाही." असं म्हणून त्याने गाडी चालू केली.

* *








# [४]

आमच्या लग्नाची तारीख नक्की ठरली आणि मी तयारीला लागले. लग्न झाल्यावर आम्ही आईच्याच घरी काही दिवस रहायचं ठरवलं. आमच्या घरातल्या तीन खोल्यांपैकी दोनच खोल्या आम्ही वापरत असू. जेवणासाठी गॅलरीचा भाग बंद करून घेतला होता. तिसऱ्या खोलीत आईने अडगळ ठेवली होती. ती खोली साफ करून आम्हां दोघांसाठी घ्यायचं ठरवलं. आईने काही पैसे जमवून ठेवले होते. मी आईला विचारलं.

"तू माझ्यासाठी काही पैसे जमा केले आहेस ना ?"

"हो."

"मग हीच वेळ आहे. मला देऊन टाक. मला माझी खोली सजवायची आहे.

ती भांडेल अशी अपेक्षा होती. पण तसं काही झालं नाही.

"पण तो काहीच का देणार नाही ?"

"देणार आहे ग."

"माझ्या कपाटातील वरच्या खणात ठेवलेलं सारं तुझं आहे."

दोनशे रुपये, एक अंगठी, इअरींग जोड आणि दोन बांगड्या इतकं सारं पाहून मला आनंद झाला. मी आईला आनंदाने घुसळलं.

"अशी नाचू नकोस. माझ्या हातात सुई आहे. ती टोचेल." ती शांतपणे म्हणाली.

"पण तू हे सारं मनापासून देत आहेस ना ?"

"मनापासून." सुई हातात घेत ती म्हणाली.

"मी राजेशबरोबर लग्न करणार हे खरं नाही वाटत."

"मला ते केव्हाच खरं वाटलं नाही आणि आता तर मुळीच नाही."

"मग कां मला पैसे देतेस तू ?"

"हे पैसे इथेच रहाणार आहेत. बाहेर नाही जाणार."

"तू माझ्याबरोबर खरेदी करायला येणार नाही का ?"

"मला त्याच्याशी काही कर्तव्य नाही. तुला जे काही करायचे असेल ते कर."

दरम्यानच्या काळात मी फारच सुखात होते. मी राजेशला दररोज भेटत असे. आणि जेव्हा जेव्हा योग्य वेळ सापडे तेव्हा शरीरसंबंधही करीत असे. कधी गाडीच्या मागल्या सीटवर, कधी काळोखात, निर्मनुष्य रस्त्यात, कधी शेतात तर कधी राजेशच्या मालकाच्या बंगल्यात राजेशच्या खोलीत. एका रात्री तो मला पोचवायला आला तेव्हा माझ्या खोलीतल्या कोपऱ्यात, जमिनीवरच आम्ही ते केलं. राजेशबरोबर मी असले की सबंध वेळ मी त्याचा हात माझ्या हातात धरून दाबत असे अगर त्याच्या केसातून बोट फिरवीत असे. मी नेहमी कामवासनेने पिडलेली असे आणि राजेशकडून मला सुख मिळत असे. तितकं चांगलं सुख मला दुसऱ्या कुणाकडून मिळालं असतं की नाही ह्याची तेव्हा मला कल्पना नव्हती. राजेशला कुरवाळताना जे कौशल्य, जो गरमपणा व जी कामुकता मी दाखवत होते, ती आम्ही प्रेमात पडलो म्हणून नव्हे तर पुरुषाला सुख देण्याची मला ईश्वरी देणगीच आहे.

स्टुडिओतलं काम संपलं की मी राजेशला बरोबर घेऊन शॉपिंग करण्यासाठी जात असे. माझ्याजवळ खर्च करण्यासाठी फारच थोडे पैसे असत. म्हणून मी ज्या वस्तू विकत घेऊ शकणार नाही त्या वस्तू पण मी काळजीपूर्वक पाहत असे. त्यांच्या किंमतीविषयी चर्चा करत असे. मी राजेशच्या मालकाच्या बंगल्याला भेट दिल्यापासून चैन काय असते याची मला कल्पना आली होती. पण ती तसली चैन माझ्या कमनशिबामुळे करता येत नव्हती. शरीरसुख घेणे हीच एक माझ्या दृष्टीने चैन राहिली होती.

अनेक दुकानं धुंडाळल्यावर आणि हुज्जत घातल्यावर मी फर्निचर वगैरे खरेदी केलं. ज्या दिवशी मी फर्निचर वगैरे सामान घरी आणलं तो दिवस माझ्या आयुष्यातला सर्वात सुखाचा दिवस होता. ती मंद पांढरा रंग असणारी खोली माझीच आहे का याचा मला विचार पडला. एवढी बदललेली खोली पाहून मी सुखावून गेले.

मी ज्या स्टुडिओत मॉडेलिंग करीत असे तिथेच येणाऱ्या मुमताज नावाच्या मुलीशी माझी दोस्ती झाली. ती उंच होती. शरीर प्रमाणबद्ध होतं. रंग गोरा, काळे कुरळे केस, लहान पण गर्द निळे डोळे आणि लाल ओठांचा रुंद जबडा. तिची सारी वागणूक माझ्याविरुद्ध होती. आणि म्हणूनच माझी दोस्ती जमली होती. मुमताजला मॉडेलिंगशिवाय दुसरं कोणतच काम नसे. तरीपण ती नेहमी सुंदर कपड्यात येत असे. कारण फिरोजकडून तिला हे सारं मिळत असे. आपला नियोजित वर म्हणून फिरोजची तिने माझ्याशी ओळख करून दिली होती. फिरोज उंच, सुदृढ शरीरयष्टीचा, अंड्यासारखा गोल गुळगुळीत चेहरा असलेला माणूस मला त्यावेळी फार सुंदर वाटला होता. त्याची वागणूक नेहमीच लाघवी असे. त्याचे कपडे उंची असत. मी आणि राजेश जशा लग्नाच्या गोष्टी करीत असू तशी ती दोघं केव्हाच करत नसत. माझ्यापेक्षा खूप अनुभवी असलेली मुमताज मला नेहमी अनेक गोष्टीत उपदेश देत असे. थोडक्यातच सांगायचं म्हणजे जीवनाबद्दल तिच्या आणि माझ्या आईच्या कल्पना मिळत्या जुळत्या होत्या. मुमताजच्या या कल्पनांना कोणी विरोध करील असे तिला वाटलं नव्हतं. पण मी जेव्हा तिला विरोध करू लागले, तिच्या वागण्यावर टीका करू लागले तेव्हा तिला धक्काच बसला. आणि ती मला बळजबरीने आपल्या ताब्यात ठेवायचा प्रयत्न करू लागली.

मी धाणेरड्या कपड्यात फिरते; गरीबीत जीवन जगते हे तिला आवडत नसे. ती मला मूर्ख समजत होती. माझ्या सौंदर्याचा, पैसे मिळवण्यासाठी, श्रीमंतीत राहण्यासाठी खूप उपयोग होण्यासारखा होता. मी जेव्हा तिला राजेशबरोबर लग्न करणार असल्याचे सांगितले तेव्हा तिने पहिला प्रश्न विचारला, राजेश काय करतो. तो शोफर आहे हे समजताच तिचा चेहरा पडला. तरीपण तिने त्याच्याशी ओळख करून घेण्याची इच्छा प्रदर्शित केली.

(पृष्ठ ५७ वर पहा)








मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




## शिवकालीन अहोमी सरसेनापती

# लसित बडफुकन

—माधव राजपाडे

**मोगल सम्राटाच्या सज्ज सेनेशी सतत साडेतीन वर्षे (ऑगस्ट १६६७ ते एप्रिल १६७१) पर्यंत गनिमी काव्याने टक्कर देऊन आसामच्या हिंदू राजघराण्याची प्रतिष्ठा वाढविणारा हा धुरंधर शिवकालीन सरसेनापती लसित बडफुकन सद्यःपरिस्थितीत अनाठायी कुप्रसिद्धीस पात्र झाला म्हणून मराठी वाचकवर्गास ह्या शूरवीर भारत-सुपुत्राची खरी ओळख करून देण्याचा हा प्रयत्न . . .**

नरकासूरवंशीय पाल घराणे ११२५ च्या सुमारास लोप पावल्यानंतर प्राय: एक शतक ईशान्य आसाम बहुतांशी अरण्यमय व निर्मनुष्यच राहिला असावा. अशा ह्या प्रदेशात इ. स. १२२८-मध्ये नवल घडले. स्वैर फोफावलेल्या ह्या घोर व भयप्रद अरण्य-मय प्रदेशातील दीहिंग व दीखू नद्यांच्या खोऱ्यात अहोम वंशीय राजा सुकफाने ब्रह्मदेशीय शानप्रदेशातून पदार्पण केले व ईशान्य भारताच्या इतिहासाचे नवे भूर्जपत्र लिहिले. पूर्व भारताचा वन-वास संपला. अरण्याच्या अस्मिता प्रगल्भ होत गेल्या. गावे वसली. राजा, प्रजा, सैन्य व राजधानी ह्यांनी आसाम साकार झाला व हळु-हळू बळकट झाला. राजांनी व मुत्सद्यांनी मोठ्या कर्तबगारीने सर्वांगी सजवला. दिग्विजयाचे युग सुरू झाले. अहोम राजकुलाने राजकर्तव्याचे भरपूर माप ओतले. १७ व्या शतकारंभी म्हणजे १६०३ मध्ये अहोमराज सुसेंगफाने 'प्रतापसिंह बुद्धिस्वर्गनारा-यण असे नवे हिंदू नाव धारण केले व पूर्वजांनी बांधलेल्या प्रासादा-वर वैभवाचे शिखर चढवले. राज्याच्या सीमा पश्चिमेस कारा-तोया नदीच्या तीरापर्यंत पोहोचवल्या व अर्थातच कुचविहारच्या कोच राजास अहोमांचे मांडलिकत्व पत्करण्यास भाग पाडले. तत्पूर्वी कोचराजा नरनारायणाच्या मुदतीत कोच राज्य प्रबळ झाले होते व त्याच्या सीमा पूर्वेस गौहात्तीच्या सान्निध्यातील बडनदीपर्यंत व पश्चिमेस महानंदा नदीपर्यंत पसरल्या होत्या. नरनारायणानंतर भाऊबंदकी माजली. कोच राज्य बुडाले व हे विच्छिन्न राज्य पुत्र लक्ष्मीनारायण व पुतण्या रघुदेव यात दुभागले. पश्चिम भाग—कुचविहार उर्फ बड दिवाण लक्ष्मीनारायणाकडे राहिला व पूर्व भाग कुच हाजो अर्थात् सरुदिवाण रघुदेवाने गिळंकृत केला. विभाजनाने महत्त्वाकांक्षी रघुदेवाचे समाधान झाले नाहीच आणि त्याचा चिरं-जीव परिक्षित याने लक्ष्मीनारायणाशी उघड वैर धरले. स्वत्वहीन व स्वाभिमानशून्य लक्ष्मीनारायणाने शरणागती पत्करून प्रथम बादशहा अकबर व तदनंतर जहांगीराकडे मदतीची याचना केली. मोगलांनी लक्ष्मीनारायणास कुचविहारचे मांडलिकत्व दिले आणि परिक्षिताचे राज्य मोगल साम्राज्यात विलीन केले. ह्यास प्रत्युत्तर म्हणून व प्रतिकारार्थ अहोम राजांनी इ. स. १६१४ मध्ये परिक्षि-ताचा भ्राता धर्मनारायण यास बडनदीजवळ दरांगच्या प्रदेशाचा मांडलिक राजा नियुक्त केला. अशा प्रकारे मोगल व अहोम राज्यांच्या सीमा लगत आल्या. मोगलांचे चपळ घोडदळ व अहोमांचे वृंद हत्ती यांच्यामध्ये झुंज जुंपली व येथूनच साठ–सत्तर वर्षे टिकलेल्या वितुष्टास प्रारंभ झाला.

## जयध्वजसिंहाचा दूरदर्शीपणा

इ. स. १६१४ मध्ये बंगालचा मोगल सुभेदार व अहोमराज स्वर्गदेव प्रतापसिंह यांच्यामध्ये युद्धास प्रारंभ झाला. विजयश्रीने वेळोवेळी दोघांपैकी कोणा एकास माळ घालावी अशी झोंकाझोंकी ह्या काळात झाली. इ. स. १६३९ मध्ये मात्र मोगलांनी अहोम-राजाचा पराभव केला. तत्समयी दोघांमध्ये झालेल्या तहानुसार मोगल अधिराज्य बडनदीपर्यंत पसरले व गुवाहाती शहरावर हिरवे निशाण फडकू लागले. मूर्तीभंजक इतिहास प्राक्कालीन कामाख्या देवीच्या मंदीरापर्यंत पोचले. इ. स. १६५७ मध्ये रोगग्रस्त बादशहा शहाजहान आसन्नमरण झाला. जहांगीराने आपल्या पित्याच्या मृत्यूपूर्व काळात जे केले त्याचीच पुनरावृत्ती शहाजहानने ही केली होती. अशा ह्या उच्च संस्कृतीत वाढलेल्या शहाजहानच्या पुत्रातही चुरस लागली. भावाभावात शत्रुता वाढली व इ. स. १६६२-पर्यंत दिल्ली तख्त हस्तगत करण्यासाठी जयध्वजसिंहाने साहजिकच ह्या सोन्यासारख्या संधीचा फायदा घेतला व मोगलांना संकोश-नदीच्या पश्चिमेकडे हाकलले. अर्थातच परिक्षिताचे राज्य अहोम-राज्यात विलीन झाले.

पादशाही वळकावल्यानंतर संतप्त औरंगजेबाचे लक्ष आसाममध्ये झालेल्या नामुष्कीकडे वेधले. एका क्षुल्लक प्रादेशिक राजाने त्याचा पराभव करावा याने त्याचा तीळपापड उडाला होता. प्रख्यात सेनानी मीर जुमला याच्या नेतृत्वाखाली मोगल सैन्य पूर्वेकडे रवाना झाले. दैवाने हात दिला. गुवाहातीचा कर्तबगार 'वडबडुवा गोमाई–तामुली' सेवानिवृत्त झाल्यानंतर त्याच्या जागी झालेल्या एका कायस्थाच्या नियुक्तीने जातीवंत अहोम दरबारी मंडळीत असंतोष नांदला होता. अशा ह्या घरभेदी भाऊबंदकीचा लाभ उठवून मीर जुमल्याने सहजासहजी यश संपादन केले. कुच-बिहार, सिमालुगढ, समधारा, गुवाहाती इत्यादी शहरे व गढ पत्त्यांच्या बंगल्याप्रमाणे कोसळत गेली व १७ मार्च १९६२ रोजी त्याने जी मुसंडी मारली ती थेट अतिपूर्वेकडील राजधानी गडगांव-पर्यंत. राजधानी पडली. असंख्य अहोम सैनिक धारातीर्थी पडले. अहोम झेंडा उडाला. अहोमराज जयध्वजसिंह नामरूपच्या डोंगराकडे आश्रयस्थानासाठी पळाला. तेथूनही त्याने लढाई चालूच ठेवली, पण क्षीण झालेल्या अहोम सैन्यास अखेर अस्त्रे टेकणेच आले व राजास जानेवारी १६६३ मध्ये घिलाझरीघाट येथे एका लाजिर-वाण्या तहावर स्वाक्षरी करणे क्रमप्राप्त झाले. तहानुसार लाखो रुपयांची खंडणी मोगल खजिन्यात दाखल झाली. शेकडो हत्ती अहोमझेंड्याखालील स्वाभिमानी आश्रयास मुकले व राजकन्या रमणी गभरु हिला औरंगजेबचा तृतीय शाहजादा आझमशहा याच्याशी विवाहबद्ध होऊन बेगम रहमतवानू अशा नव्या नामाभि-धानाखाली मिरवावे लागले. मीर जुमला एक महिना राजधानी गडगावमध्ये राहिला तद्पश्चात् रशीदखानास पश्चिम आसामचा सुभेदार नेमून परतला. त्याचबरोबर मोगल पादशाही फौजही परतली. पुनः एकवार मिळालेल्या संधीचा फायदा घेऊन जयध्वज-सिंहाने प्रतिकाराच्या तयारीस आरंभ केला. जयंतीचा राजा, कोच-बिहाराचा राजा व काचारचा राजा ह्या तिघांनीही त्यास सक्रिय सहाय्य देण्याचे कबूल केले; पण मक्षिकापात झाला. १९६३ च्या हिवाळ्यात स्वर्गदेव जयध्वजसिंह इहलोकयात्रा संपवून स्वर्गस्थ झाला. मृत्युशय्येवरून त्याने आपल्या सरदारांना राज्याला लाग-लेला कलंक धुवून साफ करण्यासाठी योग्य अशा राजाची निवड कर-ण्यास आवाहन केले. तदनुसार त्यांनी जयध्वजाचा चुलत भाऊ चक्र-ध्वजसिंह यास गादीवर बसविले. मोगलांचे मांडलिकत्व स्वातंत्र्य-प्रिय व तडफदार चक्रध्वजासही मानहानीकारक व चैतन्य-नाशक भासले व त्याने अविलंब लढाई करण्याचा आपला मानस जाहीर केला. स्वातंत्र्याच्या ठिकऱ्या उडाल्या होत्या. देश पारं-तंत्र्यात होरपळत जात होता. प्रजानाथ डोंगरखोऱ्यात वणवण फिरत होता. लढाईमुळे मनुष्यहानी व आर्थिक अवदशा झालेली होती. अशा ह्या दीन परिस्थितीवर मात करणे समंजसपणाचे होते. कारण लढाई दीर्घ व प्रखर होणार हे निश्चित होते. भाग्य उदयास येत होते. अंधारमय वस्तुस्थितीत राजा कुठेतरी दार ठोठावीत होता. दार उघडले व फटीतून प्रकाशाचा झोत बाहेर पडला—वडफुकनच्या कर्तबगार परंपरेतील वारस लसित वडफुकन—राजा स्वर्गदेवाचा नामांकित सरसेनापती मोमाई तामुली वडबडुवाचा हा सुपुत्र. खान-दानी वंशातील समशेरीचा फर्जंद सर्वानुमते वडफुकन म्हणून नियुक्त झाला. त्याला नखेंही होती व दातही होते. कणखर, दुर्दम, शिस्तीचा कडवा प्रशासक व दक्ष सेनानी अशी त्याची कीर्ती होती. राजाने मानचिन्हे देऊन लसितला सर्फराज केला. लढाईसाठी विस्तृत तयारीस प्रारंभ झाला. धनधान्याकडे, युद्धसाधने व लष्करी पुर-वठ्याकडे लक्ष केंद्रित झाले. सांग्रामिक शिक्षण व नौकायन विद्या प्रत्यक्ष राजाने स्वतःच्या देखरेखीखाली आरंभिली. कोठारे सर्व-समय भरलेली असावीत ह्या दृष्टीने चालना सुरू झाली. सैन्यात भरतीस प्रारम्भ झाला. लक्ष एकवटले ते पारतंत्र्यातून मुक्तीकडे. सर्वभार टाकला तो रणभैरव लसित वडफुकनवर.

## बापसे बेटा सवाई

लसित हा मोमाई–तामुलीचा कनिष्ठ चिरंजीव. १७ व्या शत-काच्या पहिल्या दशाब्दीमध्ये मोमाई–तामुली तदसमयीच्या अहोम-राज स्वर्गदेव प्रतापसिंहाच्या नजरेत भरला. पात्रता व गुणवत्ता यांचा राजा पूजक; त्याने मोमाईची राजदरबारी पदस्थापना केली व क्रमेक्रमे राजखोवा, वडतामुली वगैरे उत्तरोत्तर बहुमानाची पदे बहाल केली. स्वतःच्या हिंमतीवर तो पुढे वडबडुवा ह्या पदी आरूढ झाला. इ. स. १६३९ मध्ये मोगल सरदाराशी झालेल्या तहासमयी तो आणखीनच नावाजला. त्याची कन्या पखरी गभरुचे नंतर राजा जयध्वजसिंहाशी लग्न झाले. इ. स. १६०८ पासून राज्याचे संगठन आरम्भिले व मोगलांच्या मन्सबदारीच्या आधारे राज्यात वड, साईकिया, हजारिका, बडुवा, राजखोवा, तामुली, फुकन व वडफुकन असे हुद्दे निर्माण केले. आसामी गावांची पुनर्रचना आर्थिक आधारावर (Economic footing) केली व स्त्रियांना








सूतकताई व विणण्याचा (Spinı.iıg anl wcaving) मार्ग आक्रमिण्यास बाध्य केले. आसामी स्त्रियांच्या सूतकताई व विणकाम यातील सध्या दिसून येणाऱ्या कुशलतेचे श्रेय मोमाईलाच द्यावे लागते. नुसताच बडवडुवा नव्हे तर मोमाई सरन्यायाधीशही झाला. अशा ह्या ख्यातनाम पित्याचा लसित हा सवाई पुत्र. बाल्यापासून राजकारण, विधायक कामे, न्यायनिष्ठुरता, मुत्सद्देगिरीचे तो जणू बाळकडू प्यायला होता. सामरिक शिक्षण हे तर क्षत्रियपुत्रांचे विविधरंगी शिक्षणाचे एक प्रमुख अंग. त्याला लसित अपवाद नव्हता. त्याने राजपटावर प्रवेश केला ते प्रधानमंत्र्यांचा खाजगी चिटणीस ह्या नात्याने. राजकारणाचे विहंगम दृश्य त्याला ह्या खुर्चीवरून प्रथमपासूनच मिळू लागले. पुढे त्याने उत्तरोत्तर प्रगती केली व बहुमानाचा घोडाबडुवा म्हणजे अश्वशाळेचा निदेशक झाला. घोडे ज्याचे तैनातीस तो उत्तम प्रतीचा घोडेस्वार होणार हे संशयातीत. तदनंतर तो दलियाबडुवा व पुढे दोलाकशरिया बडुवा म्हणजे सांप्रतच्या रूढ भाषेतील इन्स्पेक्टर जनरल झाला. ह्या दोलकशरिया बडुवा पदावर नियुक्त असतानाच त्याची बडफुकन अर्थात सरसेनापतीपदावर सर्वसम्मत नेमणूक झाली.

### शिवरायांच्या विजयातून स्फूर्ती

लढाईची पूर्वतयारी जारी असताना राजा चंद्रध्वजाने शेजारी व मांडलिक राजांची हार्दिक सहानुभूती मिळविण्यासाठी जयंतीया, काचार व कोच राजांशी बोलणे आरम्भिले व सक्रीय सहाय्याची आश्वासनेही मिळवली. त्याच वेळी मोगलांचे भारतातील इतरत्र यशापयश अजमावण्याची त्याने दक्षता बाळगली. ह्याच संदर्भात कोचराज प्राणनारायणाने राजास १६६६ च्या आरंभास कळवले की 'पश्चिम भारतात शिवाजी राजाने मोगल सैन्यास मूग गिळण्यास लावले, वीस दिवसांची कूच करावी लागेल इतके मागे हटवले, दाऊदखानास यमसदनी पाठवले व पुरंदर मुक्कामी दिलेरखानास जखमी केले. तदर्थ पादशहा गडबडला व दिल्लीचे तख्त सोडून आग्र्यास पोचला.' चक्रध्वज आनंदिला. मोगल सैन्य अजिंक्य नाही व मर्द मराठ्यांच्या राजनिष्ठेवर व कडव्या शक्तीवर विसंबून शिवरायाने मोगलांची रणांगणात जागोजाग मानहानी केली. ह्या सर्व घटनांनी चक्रध्वजासही चेतना मिळाली व आवेश चढला. मोगलांवर चालून जाऊन त्याच्या फौजेचा फन्ना उडविण्याचा बेत आणखी पक्का झाला. अवसान वाढले. जिंकण्याची ईर्षा अधिकच वृद्धिंगत झाली.

शकसंवत १५८९ गुरुवार भाद्रपद तृतीयेस (इ. स. २० आॅगस्ट १६६७) रणभेदी तुताऱ्या वाजू लागल्या. अहोम व हिंदू रीतीरिवाजाप्रमाणे अनिष्ट निवारणार्थ शास्त्रोक्त कर्मे उरकली. रणचंडीकेने आशीर्वाद दिला आणि मोगल साम्राज्याच्या डाव्या कुशीत त्रिशूळ घुसविण्यासाठी राजधानी गडगावातून, ब्रह्मपुत्रेच्या जलमार्गाने व दोन्ही किनाऱ्यावरून अहोम सैन्य कालियाबारकडे नव्या शिलंगणास निघाले. मजल दरमजल आसामची भूमी स्वतंत्र होत गेली. सप्टेंबर १६६७ मध्ये बाहबारी पडले व पाठोपाठ काजली, सोनापूर, पानीखैती व तातीमारा दुर्गांवर अहोम झेंडा लहरू लागला. अवघ्या चार महिन्यातच म्हणजे गुरुवार कार्तिक १७ व्या तिथीस (इ. स. २ नोव्हेम्बर १६६७) अहोम सैन्याने गौहातीमध्ये गौरवाने पदार्पण केले, नीलाचलावरून यवनांना मागे हटवले, आसमंत स्वतंत्र केला व अहोमराजांचे प्रभुत्व पुनश्च स्थापिले. ब्रह्मपुत्रा आनंदली. सुभेदाराची फौज बारेमाप कापली गेली व परकीयांच्या रक्ताने लौहित्यनदीला अधिकच लाली चढली. मोगल सैन्यात हाहाःकार माजला. महाभयंकर तुफान उठले. अहोम सैन्याने तांडव केले. प्रतिस्पर्धी सैन्याचा धीर पार सुटला व सुभेदार सय्यद फिरोझखान व भाऊ सय्यद साना बक्षी अहोम कैदखान्यात पाहुणे म्हणून आले. रणनवऱ्यांचे वारस विजयी झाले. गेलेला मुलुख पुनश्च अहोम राजवटीत गौरवपूर्ण सामील झाला. राजवंशाला लागलेला कलंक अंशतः धुतला गेला. तदर्थ विजयी राजा चक्रध्वजाने ब्रह्मपुत्रातीरी विश्वनाथ तीर्थास यात्रा करून युद्ध साफल्याच्या आनंदात यज्ञ केला. राजधानीत गुढ्या तोरणे चढली. ह्या बुलंद यशाची युगानुयुगे आसामच्या नवयुवकांना स्मृती रहावी म्हणून गुवाहाती येथे एका स्तम्भलेखात व नौगाव जिल्ह्यातील सीमालुगढावरील एका तोफेवर शक १५८९ चा हा अपूर्व विजय गर्वमय शब्दात कोरला गेला. मर्द सेनापती लसित बडफुकनचा हा विजय शतकानुशतके तरुण आसामी जनतेस चेतनामय राहील इतका अपूर्व निश्चित खरा.

### एक लाखावर सेना उभी केली

ह्या विजयाने तो गाफिल झाला नाही. पुढे वाढून ठेवलेल्या आणखी प्रदीर्घ चढाईच्या सांगोपांग तयारीची पराकाष्ठा करणे उघड होते हे त्याने आधीच ताडले होते. मोर्चे व तटबंदी अधिक अभेद्य करणे क्रमबाध्यच होते. प्रत्येक सरदारास व सेनानीस आपापली कामगिरी वाटण्यात आली. पर्वती वाटा व खिंडींची तपासणी झाली. तटांच्या अंतर्गत व घाटमाथ्यावर अधिक तोफा उभारल्या



अनुक्रमणिका





गेल्या. ब्रह्मपुत्रेच्या पात्रात मेढेकोट उभारले गेले व पांडूअमीनगाव ह्या आघाडयांवर साम्राज्यवाद्यांशी तोंड देण्यासाठी लसितने स्वतःच्या नेतृत्वाखाली अहोम सैन्यास उभे केले. १० डिसेम्बर १६६७ रोजी औरंगझेबापुढे सादर केलेल्या मोगल अहवालात लसितची सेना एक लाखावर होती हा उल्लेख सापडतो. आसामातील ह्या तुफानी धुमाकुळीची व सुभेदाराच्या पीछेहाटीची खळबळजनक वार्ता ऐकून उन्मत्त सम्राटास विषाद वाटणे असाधारण नव्हते. मानकऱ्यांना दरबारात पाचारण करण्यात आले. प्रश्न होता लसितचा बीमोड करण्याचा. अहोम दौलतीवर वरवंटा फिरविण्याचा. गंभीर वातावरणात पादशहाने निर्णय घेतला व अंबर घराण्यातील मिर्झा राजा जयसिंह ह्याचा तेजस्वी पुत्र राजा रामसिंह यांजकडे नेतृत्व दिले. सम्राटासाठी स्वतःचा जीव धोक्यात घातला व इतरही त्याग केला असला तरी रामसिंह यवनराजास 'आपला' कसा वाटणार ? म्हणूनच त्याने रशिदखानाचा पाय रामसिहाच्या पायाशी बांधलाच. इ. स. १६६८ च्या जानेवारीमध्ये, असंख्य इतर सरदारांसह ५०,००० च्या वर पायदळ, घोडदळ, तीरंदाज असे विविधरंगी प्रचंड व सज्ज सैन्य आसामकडे मार्गक्रमणा करू लागले. प्रथम डाक्यास मोगल राज्यपाल शाहिस्तेखानाकडे त्याने पहिली मजल मारली. शाहिस्तेखान वंग राज्यपालाने रामसिहाला उपदेश केला की 'आसामी फार कल्पक, महाचिवट व बिलंदर आहेत. त्यांना गनिमी काव्याचा मंत्र प्राप्त झाला असून परमपराक्रमी आणि अनुभवी सेनापती इतिपूर्व अपूरे पडले आहेत. त्यातून अहोमांना रोगट हवामानाची साथ. तेव्हा हुश्शारीने कार्यपूर्ती करणे उचित होईल' इत्यादी. रामसिह पुढे सरसावला व मोगल सैन्याने रंगमती येथे फेब्रुवारीमध्ये तळ दिला. समर्थ सेनानी रामसिहास मोगल सेनेचे नेतृत्व मिळाल्याने लसित घाबरला नाही किंवा भेदरला नाही. उलट परधर्मीय पादशहाच्या सेवेतील ह्या स्वराज्याच्या आत्मघातकी शत्रूसम्बन्धी त्याला उलट घृणाच मात्र निर्माण झाली. काय हे दुर्दैव ! राणा प्रतापसिहाचा हा जातभाई प्रादेशिक राजाचे स्वातंत्र्य हिरावून घेण्यासाठी परकीयांच्या सेवेत तत्पर असावा. रामसिह व रशीद—राहू व केतूप्रमाणे सूर्यासही ग्रासावयास दोघेही प्रस्तुत. अहोम राजासारख्या कंटकाच्या निर्दलनार्थ ! ह्या प्रखर सूर्यनारायणास तोंड देणे लसितला भाग होते. तो त्यागी, सर्वस्वाचे दान करण्यास, रुधिराच्या अर्घ्यदानास व प्राणदानास तयार होताच. धारातीर्थात तो उभा होता. कशासाठी तर ह्या राहू-केतूच्या नरड्यातून स्वातंत्र्याचे माणिक बाहेर काढण्यासाठी. नरराक्षसांची लाट अंगावर आली होती. उलटच्या लाटांशी, उलटच्या वाऱ्यांशी लसितला झुंजावयाचे होते. दीर्घवेळ सामना करावा लागणार हे उघड होते. अधिक खडतर तयारी करावी लागणार हे सुद्धा तितकेच उघड होते. त्याला अधिक समय हवा होता. लसित तयारीस लागला. सैन्याची फेरबदल झाली. सरहद्दीची तटबंदी अधिकच बळकट करण्यास प्रारंभ झाला. स्वतःच्या मामानेच गुवाहातीच्या तटबंदीत शैथिल्य दर्शविल्याबद्दल व विलंब लावल्याबद्दल, खंबीर लसितने त्याचेही शिर धडापासून वेगळे करवले. कारण एकच की शिस्तीचे उल्लंघन करणाऱ्यास किंवा शेळपटपणा, भोंगळपणा व कामचुकारी करणाऱ्यास पुढे वाढून ठेवलेल्या घोर परिणामांचा कठोर दाखला मिळावा. सैन्यावर जरब बसली. डुलत डुलत आलेल्या ह्या कठोरशत्रुशी सामना देण्यास व तदर्थ लागणाऱ्या अधिक खडतर तयारीसाठी वेळ मिळवणे भाग होते. पण ते कसे व्हावयाचे ? अजगराप्रमाणे मोगल सैन्य पुढे पुढे सरपटतच येत होते. एप्रिल १६६९ मध्ये शत्रू गुवाहातीच्या जणू पश्चिमद्वारी म्हणजे सुवालकुचीपर्यंत येऊन ठेपला. स्वराज्याचे स्वातंत्र्य टिकविण्यासठी काळजी वाळगणारा लसित क्षणभर चिंताग्रस्त झाला खरा, पण गडबडला नाही. आणखी थोडा तरी वेळ मारून नेणे अपरिहार्यच होते. आता एकच उपाय. पश्चिम भारतात शिवरायाने जो योजिला तोच. गनिमी कावा ! कल्पकता हा आसामी सैन्याचा गुण आहे असे शाहिस्तेखानाने आधीच वर्णिले होते. धूर्त लसितने तेच केले व रामसिहास पत्रलिखाणात डांबवले.

### निरोपानिरोपीचे राजकारण

पूर्वी अटक झालेला सुभेदार फिरोझखान मुक्त झाला व लसितचा लखोटा घेऊन रामसिहाकडे रवाना करण्यात आला. त्यात निरोप होता की समेट घडवण्याचा युद्ध हा एकमात्र मार्ग नव्हे. त्यासाठी सामोपचार वगैरे अन्य उपायही उपलब्ध आहेत. ते समयोचित उपयोगात आणणाराच खरा जाणता मुत्सद्दी. औद्धत्य हा अर्थातच पुंडांचा एक मुख्य गुण. रामसिहाने फिरोझखानास उत्तरासह परत पाठवला. 'मी राजा मुकुंदाचा वंशज लढाईस उद्युक्त आहे. वडफुकन कोणी साधासुधा असामी नसून वडबडुवाचा

चिरंजीव आहे. त्याने लढाई देण्यास सादर व्हावे. लढाईची सामुग्री कमी असेल तर मजकडे याचना करावी. मी देईन. नाही तर गुवाहातीचा मोगलांचा मुलुख मजकडे सुपूर्द करावा.' लसितला वेळेचे महत्त्व होते. त्याने परत निरोप पाठवला की 'गुवाहाती व कामरूप मोगलांचे मालकीचे मुलुख नव्हेत. कोचवंशीयांकडून अहोमराजांनी तो प्रदेश मिळवला आहे. कर्मधर्म संयोगाने तो मोगलांच्या हाती पडला. प्रत्यक्ष सर्वसाक्षी परमेश्वरानेच तो अहोमांना परत केला. जेव्हा ईश्वरच तो मोगलांना देईल तेव्हाच त्यांना मिळेल. तत्पूर्वी नाही. लढाई देण्याचाच प्रश्न असेल तर देहात शेवटचा रक्तबिंदू असेपर्यंत लढत देऊ. सामुग्रीसम्बन्धी बोलावयाचे झाले तर आमच्या राजाला काही कमी नाही. तुम्ही दूरदेशाहून अनेक महिन्यांची मजल करीत आला आहात. काही कमी पडल्यास आमच्याकडे मागणी करावी. देण्याचा प्रयत्न करू.'

उत्तरादाखल राजा रामसिंह गुवाहातीच्या अधिकच जवळ म्हणजे गुवाहातीपासून पश्चिमेकडील हाजो या मुक्कामी येऊन ठेपला व लसितला घाबरवण्यासाठी त्याने एका पिशवीत खसखशीच्या बिया घालून पाठवल्या. अर्थ हा की मोगलसैन्य पिशवीतील बियांइतके अगणित आहे. त्याला लसितने उत्तर पाठवले की खसखस कुटली तर त्याची पातळ खळ करता येते.

अशाप्रकारे निरोपानिरोपीमध्ये अहोमांनी बराच काळ घालवला व युद्धतयारी नेटाने चालू ठेवली. उलटदिशेस ह्या अहोमांच्या अमेद्य तयारीने मोगल लष्कराचा नैतिक जोम हळूहळू खचू लागला. ह्याची खबर अहोम राजमंत्री आतन बुरगोहाईंच्या छावणीत पोहोचली. लसितचे ईप्सित साध्य होऊ लागले व मोगलांशी निडर सामना देण्याचा त्याचा निर्धार अधिकच वळावला. परिणामांती राहू व केतू–रामसिंह व रशिद–यांचे आपसात हळूहळू वितुष्ट वाढू लागले व रागाच्या भरात रशीदखानाने रणांगणातून आपले अंग मागे घेतले. अखेर नाइलाजास्तव रामसिंहाने सराई अमीनगांवच्या तटावर चढाई केली व युद्धास तोंड लावले; पण अहोम सैन्याने संरक्षणार्थ तात्काळ सभोवतालच्या खंदकात पाणी भरले व शत्रूस अटकाव केला. मोगलांनी तोफांचा भडिमार केला व दरांगमार्गे आडवाटेने गुवाहातीवर घोडदळ व बरकंदाज पाठवले; पण बडफुकनच्या सैन्याच्या एका तुकडीने डोंगरामधील खिंडींचा पूर्ण फायदा घेऊन प्रतिपक्षाची वाताहतच केली. रामसिंहाचा पुतण्या धारातीर्थी पडला.

पावसाळ्यापूर्वीच्या ह्या चकमकी जणू घावपळीच्या झटापटीच. त्या निर्णायक लढाया नव्हत्या. वेढा पडला तरी गनिम लसितने लढाईस समक्ष तोंड दिलेच नाही, किंबहुना टाळलेच. शत्रुपक्षाची अन्नसामुग्री व पुरवठा संपुष्टात यावा हा त्यामागील हेतू. शक्यतितका उशीर करून तटबंदी मजबूत करण्यात तो व्यस्त होता. गनिमी काव्यानेच ह्या वेळेस अधिक साधावयाचे होते. प्रतिस्पर्ध्यास चवचवीत असे यश कोणत्याच चढाईत त्याने मिळू दिले नाही. उलट पक्षी त्यांना गांजवून सोडले. त्रस्त व ग्रस्त केले.

## स्वकीयांकडून पायओढणी

इच्छा नसतानाही वाटाघाटी करण्यात ओढला गेलेला रामसिंह निष्पन्न काहीच होत नाही म्हणून अधिकाधिक अधीर होत गेला. आता त्याने लाचलुचपतीचे खेळ खेळण्यास सुरुवात केली व अहोम सेनानी सांदीकुई फुकनकडे लसितच्या नावे घादांत खोटा लखोटा पाठवला. लसितने एक लक्ष रुपयांची लाच घेऊन लढाई न करण्याचा बेत केला आहे असा त्यात बुद्धयाच खोटा आरोप केला. सांदीकुई फुकनने अधीरपणाने ही बातमी राजा चक्रध्वजास तुरन्त कळवली. याच सुमारास मत्सराने ग्रासलेल्या व पदभ्रष्ट झालेल्या लसितच्या पूर्वीच्या बडफुकननेही लसित विनाकारण लढाई लांबत ठेवतो आहे, अशी कुरापत राजापाशी काढली. अविचाराच्या भरात राजा चक्रध्वजाने लसितला लढाई संपवण्याची आज्ञा केली व तसे न केल्यास घोर परिणामांचा धाक घातला. राजपुतांच्या चपळ घोडदळाशी उघडपणे घोडामैदानावर लढाई देण्याची अहोम सैन्याची क्षमता नव्हती व अपयश हे नक्कीच येणार हे जरी लसितला उघड दिसत होते तरी राजाज्ञा मोडण्याने होणारे दुष्परिणाम जाणण्याइतका तो धूर्त होता.

अलाबोई येथे लढाईस तोंड द्यावे असे रामसिंहाने लसितला आव्हान दिले. त्याचा अव्हेर न करता ४०,००० सैनिकांसह लसित सरसावला. आमचे सैन्य संख्येने कमी आहे तेव्हा तुला यश मिळाल्यास त्यात श्रेय नाही अशी कानपिचकी त्याने रामसिंहास दिली. निरोपानिरोपीस कंटाळलेल्या रामसिंहाने उत्तरादाखल आपल्या सैन्याच्या आघाडीस मदनावती नामे एका स्त्रीला उभे करून 'स्त्रीची हार केलीत तर तुलाही श्रेय नाही' असेच सुचवले. अर्थातच मदनावती मृत्युमुखी पडली व सैन्याचे नेतृत्व मीर नवाबाकडे आले. त्याचाही पराभव करून लसितने त्यास अटकेत टाकले. पण ह्या अल्प विजयाचा दुष्परिणाम असा झाला की अहोम सैन्य गाफिलसे झाले आणि रामसिंहाने डाव साधला. लुटीसह आपल्या छावणीत परतणाऱ्या अहोम सैन्यावर रामसिंह मशहूर राजपूत घोडदळासह तुटून पडला आणि दशसहस्र अहोमी सैनिक कापले गेले. ह्या कत्तलीने लसित साहजिकच हळहळला, पण डळमळला नाही. रणांगणात उभ्या असलेल्या समर्थ सेनानीने दिलेल्या पोक्त उपदेशावे केवळ आततायी व उतावीळपणे उल्लंघन केल्याबद्दल राजा चक्रध्वज पस्तावला. यशाने मदांध झालेल्या रामसिंहाने गुवाहाती मोगलाकडे वापस देऊन १६३९ ची वस्तुस्थिती पुनः स्थापित करावी अशी मागणी पाठवली व लाचलुचपतीचा प्रकार

पुनश्च सुरू केला. लसितने स्वतःच्या मामास दिलेल्या कठोर देहांत शिक्षेचीही त्याच्या सैन्यास भूल पडली नव्हती व लाचलुचपतीच्या प्रकाराला ते अर्थातच बळी पडले नाहीत. अहोम सैन्य बधले तर नाहीच, उलट रामसिंहाचीच त्याच्या पादशहाने निर्भत्सना केली. 'अहोमांशी लढाई करण्यास मी तुला पाठवले आहे, मैत्री करण्यासाठी नव्हे' ही पादशहाची कानउघाडणी अंबरवंशजाला डाचू लागली. ह्या डाचणीचा प्रभाव असेल किंवा अपयशाचे खापर डोक्यावर फुटणार ह्या कल्पनेने असेल, रामसिंहाने लसितशी सरळ-सरळ दोन हात करण्याचे ठरविले. त्यातच खबर मिळाली की लसित रुग्णशय्येवर पडला असून आसन्नमरण आहे. निर्णय कृतीत आणण्यास विलंब लागला नाही. युद्ध पेटले. फिरंग्यांनी तोफा डागल्या. व घोडदलाने गुवाहातीच्या दिशेने मुसंडी मारली.

## मृत्यूशय्येवरूनही लढण्याचे यशस्वी नेतृत्व

पुनः एकवार मक्षिकापात झाला. एप्रिल १६७० मध्ये राजा चक्रध्वजाचे देहावसान झाले व त्याचा बंधू उदयादित्य गादीवर आला. नाव उदयादित्य पण उगवत्या आदित्याचे तेज त्याच्यात नव्हते. नाही धमक ना हिम्मत. त्यात तडफदार सरसेनापती रुग्णशय्येवर. ना राजाकडून आवेशयुक्त प्रोत्साहन ना वडफुकनचे धडाडी नेतृत्व. अहोम सैन्याचे अवसानच नाहीसे झाले जणू. माघार घेण्यासाठी अहोम सैन्याची तयारी होऊ लागली. वारे पलटू लागले. रोगग्रस्त वडफुकन आपल्या रुग्णशय्येवर चिंताग्रस्त झाला. भविष्य त्याच्या डोळयापुढे थयथय नाचू लागले. मोगलांनी विळखा घातला तर मगरमिठीप्रमाणे तो सुटणे कठीण–तळमळणाऱ्या हृदयाने त्याने आपल्या सैन्यास व सेनानींना मातृभूमीस जागून लढा देत राहण्यासम्बन्धी संदेश पाठवले, पण परिणाम झाला नाही. अखेर स्वतःच नेतृत्व हाती घेतल्याशिवाय गती नाही हे ओळखूनतो निधड्या छातीचा सिंहाचा छावा मरणासन्न असूनही बिछान्यावरूनच लढाई देण्यासाठी नौसेनेत उतरला व चमत्कार झाला. माघार घेण्यास उद्युक्त झालेल्या सेनेत नवचेतना निर्माण झाली. क्षयीभूत सेना सावध झाली, पुनरुज्जीवन झाले. दैदीप्यमान व तेजःपुंज नेत्याने सैन्यास संजीवनी दिली. पुनर्युवीभूत सेनेने अकस्मात शत्रुपक्षाचे खंडन करण्यास मुसंडी मारली. तांडवनृत्य केले–अमीनगावच्या सराईघाटावर मोगल सैन्यास जेरीस आणले–वैरी सैरावैरा पळू लागले. राहू–केतु ह्या द्वयातील रशीदखान यमसदनी पोचला व रामसिंहाने माघार घेतली. त्याचा पाठलाग करून अहोम सैन्याने दुष्मनास मनाहा नदीच्या पलीकडे हाकलले. फत्तेह झाली. कामरूप शत्रूपासून मुक्त झाले. कामाक्षादेवीच्या मंदीरावरील कृष्णछाया दूर हटली. गुवाहातीचा गड सुरक्षित राहिला, पण . . . धुरंधर बहादूर सिंह मात्र गेला. ५ एप्रिल १६७१–२३ चैत्र १५-९२ दिनी विजयशाली लसित आपले ईप्सित कार्य पूर्ण करून विजयश्रीच्या मांडीवर अस्तंगत झाला. सरदार पडला, पण अहोम झेंडा त्याने फडकवला–पूर्वेकडील हा दुसरा तानाजी मालुसरा, स्वराज्याचा दौलतबंकी, आजही जिवंत आहे. . . . पण कुठे ती स्वराज्यासाठी झटणारी लसितची सेना आणि कुठे ही स्वराज्याच्या मुळावर घाव घालणारी आजची लसितसेना. काय हा दैवदुर्विलास ! ! !

• • •




....सरकारनं माझं हृदय बदलण्याच्या शस्त्रक्रियेवर हजारो रुपये खर्च केल्याचे मला माहीत आहे.... मी कृतज्ञ आहे....मला जगायचं आहे....मला जगायचं आहे....



**ख्वाजा अहमद अब्बास**

**अनु. सौ. शोभा वराडपांडे**

भिंती..शुभ्र.. गुळगुळीत.. जंतुघ्न आणि तीन माणसं.. एक डॉक्टर..एक न्यायाधीश आणि एक..

आणि एक तो..जीवन्मृत.. अचेतनावस्थेत ऑपरेशन टेबलवर पडलेला. आणि त्याच्या काळजात एक गोळी..

'कोणत्याही परिस्थितीत हा माणूस जगायलाच हवा डॉक्टर', न्यायाधीश म्हणाले.

'मी परमेश्वर नाही जजसाहेब, पण त्याला वाचवण्याकरता जेवढं करणं शक्य आहे तेवढं सर्व करू आम्ही.' डॉक्टर म्हणाले.

त्याहीपेक्षा जास्त अपेक्षा आहे माझी. अशक्य ते शक्य करून दाखविण्याचा प्रयत्न तुम्ही करावा अशी माझी इच्छा आहे.'

'आता फक्त एकच शक्यता आहे', डॉक्टर म्हणाले, 'पण तो मार्ग किती धोक्याचा आहे हे जाणताच आपण.'

'ठाऊक आहे. पण तो तुम्ही अवलंबावा.' उत्तर आलं.

'जर आम्ही त्यात यशस्वी झालो', डॉक्टर म्हणाले, 'तर तो सर्जरीचा, विज्ञानाचा महान विजय ठरेल..

'आणि न्यायाचाही ! केवळ येवढ्यासाठी या दुर्दैवी माणसात रस आहे मला.'



अनुक्रमणिका

जसा त्यांनी त्याला ॲनॅस्थेशिया द्यायला सुरवात केला तसा तो हलकेच जीवन आणि मृत्यूच्या मधील संदिग्ध, निराकार प्रदेशात तरंगू लागला. तो जिवंत होता पण तरीही जिवंत नव्हता..मृत ! पण तसा मृतही नव्हता. चाळणी झालेलं त्याचं हृदय जास्त काळ तग धरू शकणं शक्य नव्हतं. दुरुस्त होण्यापलीकडे ते गेलं होतं.

ऑपरेशन टेबलवर तो पडला होता. फासळधांचा पिंजरा तोडून त्याच्या विदीर्ण हृदयाला धारदार अस्त्रे स्पर्श करू लागली होती. ऑक्सिजन..रक्त..इन्ट्रा व्हेनस ग्लुकोज.. पण वेदना आणि वेशुद्धी यांच्या गूढ, धूसर प्रदेशात तरळणाऱ्या त्याच्या अंतर्मनाला फक्त दोनच ध्वनींची जाणीव होत होती ... कुत्र्यांचे भुंकणे आणि मृत्यूची कराल शिक्षा फर्माविणाऱ्या एका घनगंभीर ध्वनीचे अनंत कठोर पडसाद.

मरेपर्यंत गळफास !..फाशी द्यावी ! फाशी द्यावी !! मरेपर्यंत..!!! मरेपर्यंत...!!...मृत्यू !!!

आवाजात यत्किंचितही कंप येऊ न देता न्यायमूर्तींनी शिक्षा फर्मावली.. 'मृत होईपर्यंत गळफास'.

आपला गळा आवळला जात आहे असं त्याला वाटलं. जणू त्या क्षणीच ती दोरी त्याच्या गळयाला स्पर्श करीत होती. अजाणता त्यानं आपली कॉलर सैल केली.

लेखणीच्या एका फटकाऱ्यासरशी एका जिवाचा निकाल लावताना न्यायमूर्तींच्या चेहेऱ्यावर दुःखाची, निदान सहानुभूतीची तरी एखादी छटा उमटते का याचा शोध तो घेऊ लागला. पण छेः ! त्यावर असलाच तर सुटकेचा भाव होता. वादी, प्रतिवादींच्या वकीलांच्या तासन् तास अनावरत चाललेल्या कायद्याच्या कंटाळवाण्या काथ्याकुटधातून सुटल्याचा भाव. त्यांनी सोडलेला एक निःश्वास. 'झालं, संपलं एकदाचं' हा भाव व्यक्त करणारा. कैद्याकडे पाहणं टाळण्याचा प्रयत्न ते सतत करीत होते.

अश्रु पापण्यांच्या कडांपर्यंत आल्याचे त्याला जाणवले. पण मोठ्या निग्रहानं ते आवरले. त्याला आपला कमकुवतपणा त्यांना दिसू द्यायचा नव्हता. या माणसाला अगतिक होऊन खून करावा लागला या जाणीवेनं न्यायमूर्तींनी त्याच्याकडे दयेचा, सहानुभूतीचा एक कटाक्ष जरी टाकला असता तरी न्यायमूर्ती केवळ खेदानं आपलं कर्तव्य बजावीत आहेत, ते देखील परिस्थितीने अगतिक आहेत असं त्याला वाटलं असते. मग त्यांना दुःख, पश्चाताप, मृत्यूची भीती यामुळे अनावर झालेले अश्रू दाखवायची लाज किंवा कमीपणा त्याला वाटला नसता. त्यानी त्यांना सुखानं मरण—कोठडीकडे व नंतर फाशीच्या तख्ताकडे आनंदानं नेऊ दिलं असतं. आपल्या दैवाशी त्यानं तडजोड केली असती.

त्याक्षणी तो एकाच त्रासदायक विचारानी उद्विग्न झाला होता. न्यायमूर्ती त्याला जेयून तो कधीच परत येऊ शकणार नव्हता अशा लांबच्या प्रवासाला पाठवीत होते. पण हे करताना साधी मानवी सहानुभूती म्हणून ते त्याला निरोप का देत नव्हते !!

त्याने पण आपल्या पत्नीला व जिवलग मित्राला जेयून ते कधीच परतू शकणार नाही अशा लांबच्या प्रवासाला पाठविले होते. पोलिसच्या परिभाषेत त्याने 'डबल मर्डर' केला होता; पण मागून हलकेच जाऊन आपल्या मित्राच्या पाठीवर वार करताना त्याचे डोळे अश्रूंनी भरून आले होते. मित्राला तात्काळ आणि वेदनारहीत मृत्यू यावा म्हणून शस्त्र खुपसायला दोन्ही खांद्यांच्या मधल नेमका भाग त्यानं निवडला होता. निश्चित कुठे बायोनेट खुपसायची हे त्याला सैनिकी शाळेत शिकविलं होतं. दहा शत्रू सैनिक ठार केले हे दर्शविणारे पदकही त्याच्याजवळ होतं. त्याचा मित्र हा त्याचा अकरावा बळी होता. तो खाली जमिनीवर कोसळताना जराही आवाज झाला नव्हता. तो तावडतोब ठार झाला होता. त्यानं हलकेच बॉयोनेट पाठीतून उपसून काढले आणि ते रुमाल.नं स्वच्छ पुसले (रुमाल कोर्टात 'एक्झिबिट ए' म्हणून पुरावादाखल करण्यात आला होता) आणि परत म्यानात ठेवले. त्यानं मित्राला हलकेच उचलून बिछान्यावर ठेवलं. पाठीत एक वेदना खोलवर गरगरत गेली आणि काय होतं आहे हे कळायच्या आतच त्याचे प्राणपाखरू अनंताच्या प्रवासासाठी उडून गेले होते. आश्चर्यानं त्याचे डोळे सताड उघडे होते. त्यानं त्याच्या पापण्या मिटल्या.

पत्नीच्या खोलीत त्यानं प्रवेश केला तेव्हा त्याचे डोळे आसवांनी डबडबले होते. ती गाढ झोपली होती. खिडक्यांमधून येणाऱ्या चंद्रप्रकाशात ती किती लहान, किती नाजुक..किती असहाय्य दिसत होती. बायोनेट म्यानातून बाहेर काढण्याची कल्पनाही त्याला असह्य वाटली. त्यानं तिचा गळा कापायचं ठरवलं होतं..पण आता त्या कल्पनेनंही त्याच्या मनाचा थरकाप झाला. तो केवळ हातांनीच ते करणार होता. गळयातील नेमकी कोणती नस दाबल्यानं शत्रू गतप्राण होतो हे त्याला सैनिकी शाळेत शिकवलं होतं. त्यानं तो धडा नीट गिरवला होता. त्याची पत्नी झोपेतच गतप्राण झाली. त्याच्या खुनी हाताचा हा बारावा बळी ! त्याला वाटलं ती आता व्यभिचाराच्या पातकातून मुक्त झाली आहे. ती पुन्हा शुद्ध झाली होती, पूर्ववत् त्याची झाली होती. त्यानं तिच्या नाजुक ओठांचं हलकेच चुंबन घेतलं. त्यांचा स्पर्श किती थंड होता. अचेतन संगमरवरासारख्या झालेल्या तिच्या छोटयाशा पावलांचं त्यानं चुंबन घेतलं. नंतर तो तिच्या बिछान्यावर तिच्या पायाशी बसला. आतापर्यंत रोखून धरलेले त्याचे अश्रू मरामर ओघळू लागले होते. ते अश्रू त्याच्या मृत मित्रासाठी, पत्नीसाठीच तो ढाळत नव्हता, पण ज्यांना मारण्याकरता त्यांनी त्याला पदक दिलं होतं त्या दहा—कोणाचे पती, कोणाचे पुत्र, कोणाची मुलं असलेल्यांसाठी—तो रडत होता. जेव्हा सकाळी त्याच्या मित्राच्या मृत्यूची चौकशी करीत पोलीस तिथे येऊन थडकले तेव्हा तो आपल्या बिछान्यावर प्रगाढ झोपेत पहुडलेल्या आपल्या मृत पत्नीजवळ स्फुंदत बसलेला आढळला.

* * *



अनुक्रमणिका







'अपराधी!' न्यायमूर्ती त्याला उद्देशून बोलत होते पण त्यांची नजर होती त्याच्या-पासून दूर... बचाव पक्षाच्या वकीलावर, 'काही सांगायचं आहे तुला?'

त्याक्षणीच काय बोलायचं आणि काय करायचं हे त्यानं मनाशी ठरवलं. 'यस सर', तो पुटपुटला आणि लडखडत उभा राहिला. डॉकमध्ये उभं राहून त्यानं सरळ न्यायमूर्तीं-वर नजर रोखली. ते दुसरीकडे पाहत होते.

मित्रा आहे हा मनुष्य. माझ्या डोळ्याशी डोळा द्यायला भीती वाटते याला. त्याच्या मनात विचार आला. त्याच्या चेहऱ्यावर एक औपरोधिक स्मित तरळून गेले.

क्षणभर शांतता पसरली. 'हं, काय सांगायचं आहे', त्या शांततेनं अस्वस्थ होत न्यायमूर्ती म्हणाले. ते आता कैद्याच्या पली-कडे उभ्या असलेल्या पोलिसाकडे पहात होते.

'युवर ऑनर' तो नम्रतेनं म्हणाला, 'मरणापूर्वी मला एकदा माझ्या घरी.. जेथे माझी पत्नी..मृत्यूमुखी पडली त्या ठिकाणाला भेट द्यायची आहे'

'मंजूर!' कोर्ट क्लार्ककडे पाहून त्यांनी मान हालवली. "जर जेलच्या नियमात बसत असेल तर. आणखी काही?"

'आणखी काही नाही, युवर ऑनर. पर-वानगीबद्दल मी आपला फार आभारी आहे युवर ऑनर...'

पोलीस त्याला नेत असता त्याच्या चेहऱ्यावर एक चमत्कारिक स्मित चमकून गेलं. न्यायमूर्तींना ते दिसलं नाही. पण कोर्टा-तील इतर लोकांनी ते स्पष्टपणे पाहिलं. त्यावरून त्याचा मेंदू सडका नासका आहे आणि त्याला मृत्युदंड मिळाला हे चांगलंच झालं याबद्दल लोकांच्या मनात शंकाच उरली नाही.



त्याची शेवटची इच्छा त्याच्या कल्पने-पेक्षा लवकर पुरविण्यात आली. एकदा उदार आणि दयाळू न्यायमूर्तींनी 'मंजूर' म्हटल्या-वर तावडतोब जेल मॅन्युअल पहाण्यात आलं. त्यात असं दिसून आलं की जर त्याला त्याच्या घरी न्यायचं असेल तर ते आताच न्यायला हवं; कारण एकदा त्याला तुरुंगातील मृत्यु-कक्षात नेल्यावर फक्त एकदाच बाहेर पडता आलं असतं. एकदाच आणि कायमचं...

* *

'तुला दहा मिनिटे मिळतील' त्याच्या तिसऱ्या मजल्यावरील दोन खोल्यांच्या ब्लॉकपर्यंत त्याला सोबत आलेल्या दोघा पोलिसांपैकी सीनिअर पोलीस म्हणाला.

'मला या खोलीत क्षणभर एकटं राहू द्या. माझ्या पत्नीच्या स्मृतीसोबत'.. तो त्यांना नम्रतेनं म्हणाला 'तुम्ही कृपा करून दाराजवळ थांबा.'

'ठीक आहे', तो म्हणाला, 'पण काही गडबड करण्याचा प्रयत्न करू नकोस नाहीतर...' आणि त्याने आपल्या कंबर-पट्टयातील रिव्हॉल्व्हरकडे बोट दाखविलं.

त्यानं आत जाऊन दार टेकून घेतलं पण आतून कडी घातली नाही.

'गंमतीदारच गृहस्थ आहे' दोघांमधला ज्युनिअर म्हणाला. प्रथम तर सरळ बाय-कोचा खून केला. आता म्हणे तिच्या आठ-वणीत त्याला काही काळ घालवायचा आहे. हूं! मी अगदी शर्तीनं सांगतो आता-पर्यंत लेकाच्याचा गळा त्याच्या बायकोच्या भुतानं निश्चितच गच्च पकडला असेल.'

'हे खुनी लोक काय करतील आणि काय नाही हे कोणी सांगू शकत नाही' सीनिअर म्हणाला. हे लोक असतात पागल. हा तर आर्मीत होता. उत्तम रेकॉर्ड होते. त्याला मेडलसुद्धा दिलं होतं त्यांनी. कमांडोमध्ये..'

पण शब्द पूर्ण उच्चारायच्या आतच तो एकाएकी थांबला. एक विचार विजेगत त्याच्या डोक्यात चमकून गेला.. 'कमां-डोला उंच जागेवरून उडी घ्यायचं प्रशिक्षण मिळालेलं असतं...'

ते वेगानं खोलीत शिरले. त्यांची भीती खरी ठरली होती. खोली अगदी रिकामी होती फक्त खिडकीची तावदानं हवेत झुलत होती. त्यांनी खाली डोकावून पाहिलं तो तिथं होता.. अदृश्य होण्याच्या बेतात. सीनिअर पोलिसनं आपले रिव्हॉल्व्हर काढलं पण दुसऱ्यानं त्याचा हात मागे खेचला. भर-गर्दीच्या रस्त्यावर बंदूक झाडणं धोक्याचं आहे याची जाणीव त्याने त्याला दिली.

'पण आपण नशिबवान आहोत', ज्युनि-अर पोलिस कैद्याने उडी मारण्यापूर्वी काढून ठेवलेल्या बुटाकडे बोट दाखवित म्हणाला, 'आपल्या कुत्र्यांना याची मदत होईल'.

* *

अविश्रांत धावण्यानं थकून जाऊन झुडु-पात निद्राधीन झालेल्या त्याच्या अर्धजागृत अंतर्मनावर कुत्र्याच्या भुंकण्याचा आवाज येऊन आदळला. प्रथम त्यानं त्याकडे दुर्लक्ष केलं. गवतातील डासांच्या गुणगुणण्याचा आवाज किंवा झाडात किरकिरणाऱ्या रात-किडयांच्या आवाजासारखा किंवा जवळ-पासच्या दलदलीतील बेडकांच्या आक्रंदना-सारखा हाही एक रात्रीच्या अनेक आवाजां-पैकी एक..पण लगेच भुंकण्याचा हा आवाज त्याच्याच दिशेनं समोर येत आहे हे त्याला जाणवलं. तो एकदम दचकून उठला. बापरे! पोलिस ब्लड हाऊंडस!! त्यांनी त्याच्या गंधाचा माग पकडला होता. क्षणाक्षणाला तो आवाज जवळ जवळ येत होता. त्याने आकाशातील पूर्ण चंद्राला एक शिवी दिली. सर्व टापू कसा स्पष्ट दिसत होता. झाडीतून बाहेर पडल्यास ते त्याला मैलावरून देखील पाहू शकतील आणि जर तेथेच राहीला तर होऊंडसनी लवकरच त्याचे ठिकाण शोधून








काढले असते. आता फक्त एकच उपाय होता तेथून पळण्याचा ! !

त्याचे सर्व चैतन्य, सर्व इच्छाशक्ती जणू त्याच्या पळणाऱ्या पायात एकवटली होती. ज्या क्षणासाठी त्याला कमांडोचे शिक्षण मिळाले होते तो जणू हाच क्षण होता. त्यानं मागे वळून पाहिलं तेव्हा कुत्र्यांच्या अंधुक आकृती त्याला स्पष्टपणे दिसल्या. त्यांनी त्यांच्या सोबत असलेल्या पोलिसांना कितीतरी मागे टाकले होते. ते दोघं होते. उड्या मारत वेगानं त्याच्यामागे येत होते. दोन विरुद्ध एक. . पण तो माणूस होता आणि ते कुत्रे.

झाडांना गोल वळसे देत, दगडातून पळत मक्याची व साळीची शेते तुडवत त्यानं त्यांना चकवायला सुरवात केली. ते माणसाचा पाठलाग करीत नव्हते, ते गंधाचा पाठलाग करीत होते. तो जिथून जिथून गेला त्याच मार्गानं जाणं त्यांना भाग होतं. त्याला पकडण्यासाठी ते शॉर्ट कट घेऊ शकत नव्हते. कमांडो शाळेत ब्लड हाऊंडकडून पाठलाग होण्याची शक्यताही त्यांनी गृहीत धरली होती. पळता पळता त्या सूचनांचे त्याला स्मरण झाले. क्षणभरही थांबलो तर कुत्रे पकडतील या भीतीने पळता पळताच त्याने आपला शर्ट काढला आणि त्याचा बोळा करून तो एका दिशेला फेकला आणि पहाडीच्या दुसऱ्या बाजूला जाऊन त्यानं आपलं अंतर्वस्त्र उतरवलं. काही क्षणांकरता मागावर असलेल्या कुत्र्यांचा गोंधळ उडाला. त्यानं त्यांना अनेक यार्डांनी मागे टाकलं. तो आता चंद्रप्रकाशात चमकणाऱ्या जलाशयापासून फार दूर नव्हता. सुटकेची एक अमोल संधी. कुत्र्यांना पाण्याच्या अथांग विस्तारातून माग काढणं शक्य झालं नसतं. जर तो तळ्यात उडी घेऊन पलिकडे पोहून जाऊ शकला तर या चतुष्पादांच्या पाठलागापासून त्याची सुटका होण्याची शक्यता होती.

त्यानं आपली उरलीसुरली सर्व शक्ती एकवटली. तो दगडावरून वेगानं पळू लागला. धारदार दगडांनी पायाला झालेल्या जखमांतून घट्ट रक्त हळूहळू ठिबकत असल्याचं त्याला जाणवलं. पण एक क्षणही थांबण्याची हिंमत त्याला होत नव्हती. कुत्र्यांनी पुन्हा त्याचा माग धरला होता. शिकारीत ब्लड हाऊंडस व घोडेस्वार मागे लागल्यावर कोल्ह्याची अवस्था काय होत असेल याची कल्पना करण्याची फारशी गरज त्याला उरली नव्हती. आता तोच कोल्हा होता.

तळं आता फक्त काही यार्डावर राहिलं होतं. मृदु हिरवळीचा स्पर्श त्याच्या पायाला जाणवू लागला होता. तो स्पर्श अधिकाधिक मृदु होत गेला. लवकरच चिखल सुरू झाला. आता सांभाळायला हवं ! त्यानं स्वतःलाच इशारा दिला. नाहीतर तो घसरून पडल्याशिवाय राहाणार नाही. आणि. .

आणि दुसऱ्याच क्षणी तो दलदलीत गुडघाभर फसला. झालं ! सर्व प्रयत्नांचा अंत झाल्याचं त्याला कळून चुकलं. आता लवकरच कुत्रे त्याच्यावर झडप घालणार होते. त्याच्याजवळ बायोनेट असते तर तो त्यांना पुरून उरला असता. पण आता त्याच्याजवळ फक्त दोन हात होते.

अत्यंत रागानं भुंकतं. पिसाळलेल्या शिकाऱ्याच्या आवेशानं कुत्रे त्याच्यावर तुटून पडले. त्यांचे तीक्ष्ण दात त्याच्या मासात खोलवर रुतत असल्याचे त्याला जाणवले. त्यांनी भुंकणं थांबवलं होतं. आपल्या भक्ष्याला छिन्नविच्छिन्न करण्याच्या अधिक महत्त्वाच्या कार्यात ते आता गुंतले होते. कमांडो स्कूलनं अशीही परिस्थिती गृहीत धरली होती. त्यानं त्यांच्या सूचना आठविण्याचा प्रयत्न केला. 'त्यांच्या नाजूक जागेवर सणसणीत लाथ हाणा,' इंस्ट्रक्टर म्हणाला होता, 'तुमच्याजवळ इतर काही नसलं तर बूटच तुमचं शस्त्र आहे'. पण तो तसं करू शकत नव्हता. त्याच्याजवळ बूट नव्हते. . . आणि पायही नव्हते. ते चिखलात खोल फसले होते आणि चिखल त्यांना हळूहळू आत गिळत होता. तो फक्त आपल्या हातांनी लढू शकत होता. कराटे टेक्निकचा उपयोग करीत प्रथम त्यानं एकावर लक्ष केंद्रीत केलं. जशी त्याने त्याच्यावर झेप घेतली त्यानं कुत्र्याची मान अचूक पकडली आणि ती मुरगळायला सुरवात केली. दुसरा कुत्रा त्याच्या कंबरेचे चावे घेत होता, लचके तोडत होता. त्याच्या मासात दात खोल गडल्याचं त्याला जाणवलं. पण एकाच ठिकाणी त्याचं मन केंद्रित झालं होतं. जणू त्याला शरीर नव्हतं, कंबर नव्हती फक्त शत्रूची मान मुरगळणारे दोन हात होते. . . फक्त दोन हात.

आणि मग एकच उरला. दुसरा दलदलीत मरून पडला होता. उरलेला पहिल्यापेक्षा जास्तच भयानक होता. आपल्या सोबत्याचं प्रेत पाहून घृणामिश्रित क्रोधानं पिसाळून तो आवेगानं त्याच्यावर तुटून पडला. ती दोन पशूंमधील लढाई होती. तो आता माणूस उरला नव्हता. तो देखील कुत्रा झाला होता.

तो आता जबड्याच्या, दातांच्या साहाय्याने लढू लागला. कुत्र्याचे चावे घेत, त्याचा दमछाक करण्याचा प्रयत्न करीत, त्याची मान मुरगाळीत, आपल्या रक्ताळलेल्या हातांनी धारदार दात असलेला त्याचा जबडा फाडण्याचा प्रयत्न करीत तो लढत होता. कुत्र्यांच्या भुंकण्याप्रमाणे त्याच्याही मुखातून निरनिराळया गर्जना, शिव्याशाप, क्रोधोद्गार बाहेर पडत होते. रक्ताळलेले हात, छिन्नविच्छिन्न शरीर, मुखातून ओघळणारे रक्त आणि लाळ यांचं मिश्रण. . . अशाही स्थितीत स्वतःतील पाशवी बळ व मानवी इच्छाशक्ती व कौशल्य पणाला लावून तो लढत होता. त्याच्यावर हल्ला करण्यांचं कुत्र्याचा आवेश आता ओसरू लागला होता. त्याचे डोळे फोडण्यासाठी कुत्र्यानं त्याच्यावर झेप घेतली व नेमक्या त्याच क्षणी त्यानं कुत्र्याचं डोकं पकडलं. लगेच त्याच्या मानचा तावा घेऊन त्याने ती पिरगळायला सुरवात केली. हळूहळू कुत्र्याची धडपड शांत झाली.

अनुक्रमणिका

त्यानं दोघांनाही ठार केलं होतं.

त्याक्षणी त्याला स्वतःची जाणीव झाली. त्याच्या लक्षात आलं की दलदलीनं त्याला कंबरेपर्यंत गिळंकृत केलं आहे. त्यातून बाहेर पडण्याची शक्ती आता त्याच्यात उरली नव्हती. निराश आणि फाटलेल्या डोळयांनी त्यानं चंद्रप्रकाशात न्हात असलेल्या भूप्रदेशावरून नजर फिरवली. कुत्र्यांची प्रेतंही हळूहळू चिखलात बुडत होती. त्याला कळून चुकलं की त्या दोघांप्रमाणं त्याचीही कबर इथंच बांधली जाणार होती.

इतक्यात त्याला कोणाची तरी चाहूल लागली. त्याच्या घरापर्यंत त्याला सोबत करणाऱ्या पोलिसांच्या जोडीतील तो सीनि-अर पोलिस होता. तो चांगलाच गले ठ्ठ होता आणि धावण्याच्या श्रमानं धापा टाकत होता. तो जवळ आला तर त्याच्या वरही कराटेचा प्रयोग करण्याचं त्यानं ठरविलं. पण त्याला जवळ येण्याची गरज नव्हती. त्याच्या हातात बंदूक होती.

'अच्छा तर बच्चमजी तुला वाटलं तू आमच्या हातावर तुरी देऊ शकशील, नाही?' चिखलात खोल बुडत असलेल्या आपल्या कुत्र्यांच्या प्रेताकडे त्याचं लक्ष गेलं. क्रोधानं पिसाळून त्यानं आपलं पिस्तुल परजलं. संतापानं ओरडत तो म्हणाला, 'यू ब्रूट! तू माझ्या ब्लॅकी आणि ब्राऊनीला ठार केलंस. मला माझ्या मुलांसारखे होते ते.'

'च्! च्!!' तो किंचित विनोदानं म्हणाला, 'सॉरी हं! मला ठाऊक नव्हतं ही तुमची मुलं आहेत म्हणून नाहीतर खुशाल मी त्यांना माझे तुकडे तुकडे करू दिले असते.' ...

'विनोद सुचतोय तुला. हात वर कर' तो त्याच्यावर भुंकला.

त्यानं हलकेच हात वर केले.

पोलिसाच्या चेहऱ्यावर एक दुष्ट स्मित झळकलं 'वा! छान! हे सगळयात सोपं आणि सोयीचं. सरळ एक गोळी काळजात आणि बस!' आणि त्यानं गोळी झाडली. त्याला काहीच जाणवलं नाही. तो अचे-तन झाला होता. . हलकेच पिसासारखा तरंगत तो स्वप्नसृष्टीत अलगद उतरला. तो पुन्हा तरुण झाला होता. पुन्हा एकदा सदानकदा हसणाऱ्या, त्याला वेडावणाऱ्या एका सुंदर बालेच्या प्रेमात पडला होता. आपलं हृदय तळहातावर घेऊन ते तिला देण्यासाठी तो तिच्या मागे धावत होता. त्या क्रूर सुंदरीनं त्याचं हृदय उचललं आणि निष्ठुरतेनं जमिनीवर फेकून दिलं. नाजूक हृदयाचे तुकडे तुकडे झाले. त्यापैकी एक तुकडा त्याच्या वक्षात खोल जाऊन रुपला. वेदनेची एक निळीकाळी लाट त्याच्या गात्रातून शिरशिरत गेली. . पण ती केवळ स्वप्नातील वेदना होती. . . त्यानंतर अनंत असीम काळ गेला. वेदनेच्या अथांग साग-रात त्याला कोणीतरी फेकलं होतं. त्या साग-राच्या तळाशी त्याला ओढू पाहणाऱ्या गुरु-त्वाकर्षणाशी तो झगडू लागला. ती दल-दल तर नव्हती? आणि नंतर तो पुन्हा एकदा तरुण झाला आणि आता त्याची पत्नी झालेली ती छोटी मुलगी त्याला म्हणत होती, 'तुझ्या-हृदयाचे तुकडे केले मी. फार वाईट वाटतंय रे मला. पण बघ मी तुला दुसरं हृदय देते हं. ज्याला तू ठार केलंस त्या तुझ्या जिवलग मित्राचं हृदय.' त्यानं ते घेतलं आणि आपल्या छातीच्या पोक-ळीत ठेवलं. पण ते फार मोठं होतं म्हणून ते आत ढकलताना त्याला ते पिरगाळून आत कोंबावं लागलं. ही क्रिया इतकी वेदना-मय होती की त्याला वाटलं आता आपण निश्चित मरणार.

मग त्याला न्यायमूर्तींचा आवाज ऐकू आला 'मी तुमचा फार आभारी आहे डॉक्टर. तुम्ही एक अलौकिक चमत्कार केलात.'. . पण हे स्वप्न नव्हतं.

दंडात सुई टोचल्याची जाणीव त्याला झाली. मग तो पुन्हा एकदा कालहीन निद्रेत तरंगू लागला.

काल आणि यातनांच्या असंख्य आवर्ता-नंतर त्यानं आपले डोळे हलकेच उघडले. त्याला एकप्रचंड सर्वव्यापी शुभ्र ढग दिसला. हळूहळू त्याची नजर स्थिरावू लागली. त्या ढगातून एक एक आकार स्पष्ट होऊ लागले. हॉस्पिटल वॉर्ड–त्याच्या शुभ्र भिंती, शुभ्र खिडक्या, पांढऱ्या रंगानं रंगवलेले दरवाजे, देवदूतांसारख्या शुभ्रवसनावृता परिचारिका आणि डॉक्टरांची देवासारखी उंच शुभ्र वेषधारी आकृती.

ते तांत्रिक परिभाषेत काहीतरी बोलत होते त्याला त्याचा अर्थ कळला नाही.

जेव्हा तो शुद्धीवर आला तेव्हा डॉक्टर त्याच्याकडे गेले. त्याला हलकेच थोपटत ते म्हणाले,

'मित्रा, आम्हांला योग्य ते सहकार्य दिल्याबद्दल व ऑपरेशनमधून सुखरूप पार पडल्याबद्दल तुझं हार्दिक अभिनंदन! जिवंत रहाण्याची तुझी इच्छा खरोखर आश्चर्यकारक आहे.'

त्यानं अडखळत विचारलं, 'माझ्या काळ-जातली गोळी काढलीत तुम्ही?'

'छेः! आम्ही तुला नवं कोरं हृदय दिलं आहे. या देशातील हृदय संक्रमणाची तू पहिलीच यशस्वी केस आहेस'.

* *

एका आठवड्यानंतर तो उशीच्या आधाराने बसू लागला. आणि एक दिवस इन्फेक्शन होऊ नये म्हणून भोवती लावलेल्या प्लॅस्टीकच्या पारदर्शक पडद्या-आडून तो पत्रकारांशी बोलला. त्याचा अशक्त आवाज त्यांना ऐकू जावा म्हणून एक जंतुघ्न केलेला मायक्रोफोन त्याच्यापुढे ठेवला होता.

'कसं वाटतंय आता तुम्हाला?' एका पत्रकारानं विचारलं.

'उत्तम' तो म्हणाला.' 'फक्त थोडी अशक्तता आहे'.

तुमची केस या देशातील हृदय संक्रम-णाची पहिली यशस्वी केस आहे हा विचार तुम्हाला उत्तेजक आणि आनंददायक नाही वाटत?

'वाटतो. खरंच वाटतो. केवळ त्याच्या विचारानं मला गिडीनेस येतो.'









'सरकारनं या ऑपरेशनवर हजारो रुपये खर्च केले हे आपणाला माहीत आहे काय ?'

'हो मला ठाऊक आहे. मी कृतज्ञ आहे. त्यांनी मला नवीन जीवन दिलं आहे.'

डॉक्टरनी पत्रकारांना खूण केली. मुलाखत संपवायला हवी, नाहीतर पेशंटवर त्याचा ताण पडेल.

'आता फक्त शेवटचाच प्रश्न. हॉस्पिटल सोडल्यावर तुमचा काय करायचा विचार आहे ?'

'मला जगायचं आहे . . . मला जगायचं आहे.'

मुलाखत संपली. काही काळानंतर त्याला वृत्तपत्रं दाखविण्यात आली. त्याचं छायाचित्र प्रथम पृष्ठावर छापलं होतं. त्याच्या तीन मिनिटांच्या मुलाखतीच्या आधारावर लिहिलेलं फिचर बाजूला छापलं होतं. त्याला सहा कॉलमी शीर्षक होतं, 'हृदयसंक्रमित रोग्याचे हृदगत . . . अधिक जीवन, नवीन जीवन.'

तीन महिन्याच्या अत्यंत महागड्या आणि विलक्षण काळजीपूर्वक केलेल्या शुश्रुषेनंतर त्याला हॉस्पिटलमधून डिस-चार्ज देण्यात आला.

'तू आता घरी जाऊ शकतोस. गुड बाय आणि गुड लक,' डॉक्टर त्याला म्हणाले.

एका आरामशीर गाडीतून त्याला एका चमत्कारिक आणि अपरिचित जागी नेण्यात आलं. तेथेही त्याला तपासायला एक डॉक्टर हजर होता.

डॉक्टरने त्याची छाती स्टेथास्कोपनं तपासली. त्याचे ब्लड–प्रेशर घेतले. त्याला दीर्घ श्वासोच्छ्वास करायला लावला. रक्त तपासणीसाठी त्याच्या बोटाला सुई टोचली.

"कैदी मानसिक व शारीरिक दृष्ट्या पूर्णतः निरोगी आहे', वॉर्डनच्या हाती सर्टि-फिकेट देत डॉक्टर म्हणाले.

'कैदी !' त्याला एकदम धक्का बसला. हो कैदी. आपण अजूनही कैदी असल्याची जाणीव त्याला झाली. त्याच्या संक्रमित हृदयाचा एक ठोका चुकला.

त्याचे हात मागून बांधण्यात येत असल्याचं त्याला जाणवलं. कुठून तरी एक धर्म-गुरु प्रगटला आणि मंदपणे गात मिरवणुकीचं नेतृत्व करू लागला, 'माती असशी मातीत मिळशी' . . .

वॉर्डन, तो.

दोन कॉन्स्टेबल्स. तरुण दुःखी व वरिष्ठ विजयाने आनंदित.

जेलर, डॉक्टर व न्यायाधीश.

त्यांनी त्याला तख्तापाशी आणलं. तेथे फाशी देणारे त्याची वाट पहात होते.

त्यांनी त्याचं मस्तक काळ्या कपड्यांनी आच्छादिलं. मानेभोवती फास अडकविण्यात येत असल्याचं त्याला जाणवलं.

जेलरनं खूण करताच खटका दाबला गेला. एका क्षणात सर्व संपलं होतं . . .

डॉक्टरनं मृत मनुष्याच्या छातीवर स्टेथास्कोप ठेवला. त्याचं हृदय–नवसंक्रमित हृदय–बंद पडलं असल्याचं त्यांनी जाहीर केलं . . . . !!

वरिष्ठ पोलीसाच्या चेहऱ्यावरील क्रूर आनंद तो लपवू शकला नाही. त्याच्या ब्लड ह्याऊंड्सचा बदला घेण्यात आला होता.

न्यायमूर्तीच्या चेहऱ्यावर पूर्ण समाधान विलसत होतं. कायद्याचं पालन झालं होतं. न्यायाचा विजय झाला होता. अपराध्याला योग्य शासन मिळालं होतं.

• • •



## शिकारी झाला सावज बघ गे !

गोरेपण गे तुझे निथळते, 'नायलॉन' पातळ अंग हरवते,  
रोमरोमी मज नेत्रचि फुलले, स्वर्गचि उरला चार अंगुळे ॥ १ ॥  
चिरडी हिरवी कंच रेशमी, जोबन हुंडी खडी बेशमी,  
हिरवा मरवा, सही कशाला, भंवरा माझा खडा घुमविला ॥ २ ॥  
जरीबुट्ट्यांचा शालू नेसला, सुपाएवढा पदर ओढिला,  
शालीनता अन् मोहरते, पहिल्या दृष्टित भान हरपते ॥ ३ ॥  
इरकली लुगडे दुटांगी काचा, पैंजण पायी ताल कशाचा,  
नखऱ्यांची अन् गुगली कशाला, जुगलबंदीने कॅच झेलिला ॥ ४ ॥  
चंद्रकळेवर टिकल्या गंमती, सख्या चांदण्या अंवती भंवती,  
उष्ण चांदणे उरात फुलले, चंद्राने बघ राहूस गिळिले ॥ ५ ॥  
सलवारीची सळसळ भारी, दुपट्ट्याची ओढचि भारी,  
भाषिक तंटा हवा कशाला, डोळघाला जर डोळा भिडला ॥ ६ ॥  
अद्-या-वत् तू, स्कर्ट तुझा गे, झुळुकहि नसता कसा तरंगे,  
थरकत कातर ओठहि हलले, हृदयपटावर चित्र रेखिले ॥ ७ ॥  
तिखट नासिका तव मर्दानी, जोड-गोळीची बंदुक नयनी,  
शिकारी कोठे आता उरला, तुझिया शब्दे सावज झाला ॥ ८ ॥  
शिवसंभव साडी तुला शोभली, फुलवंती तू तिला खुलविली,  
नाद अनामिक हुंकारांचा, मळा पिकवितो रोमांचाचा ॥ ९ ॥

नव वसन छटानी नटली नार,  
नादविला नर, रमला प्रियकर;  
नर-नारीचा जुना उखाणा,  
फंदशायरी मऱ्हाठी बाणा !

– माधव ताम्हनकर

# रात्रौ तरति नर्मदाम्!



" ....तू गतजन्मीची स्वैरीणी असावीस....इतकी अतिरिक्त कामेच्छा?....विद्वान पत्नीला हे शोभा देत नाही...." तो शय्यागारातून बाहेर पडताना म्हणाला....

चन्द्रप्रभेनं नभांगण व्याप्त झालं होतं. गंधितवायू यक्षनगरीतल्या प्रत्येक चांद्रगृहांतरीच्या प्रमत्त यौवनाच्या स्पर्शानं भानरहित झाला होता.शय्यागारात नवपरिणित प्रेमीयुगुले प्रेमसंवाद करीत होती. उष्ण श्वासोच्छवासांचं अवगुंठन त्या शब्दांना लाभत होतं. चकोरप्रिया आपल्या कोमल चंचूच्या योगानं प्रियकराला उत्तेजित करीत होती. शरदपौर्णिमेचं हे अतीव सुंदर दर्शन प्रेमिकांना अस्वस्थ करीत होतं. सेवकगृहापासून स्वामीगारापर्यंत सर्वांगानं, परिपूर्ण यौवनानं शृंगारलेली जीवने मीलनस्वप्नात अतिरिक्त रंगली होती आणि अशा या भावपूर्ण शृंगारज्योत्स्नेत स्नान करण्याला आतुर झालेली चंद्रवदना स्थिर लोचनांनी अवलोकन करीत आपल्या प्रासादाच्या चान्द्रगृहात उभी होती.

त्या शोभिवंत संगमरवरी चान्द्रगृहाच्या सज्जात ती बिंबाधरा प्रहरन्प्रहर तिष्ठत उभी राहत असे. यक्षनगरीच्या राजकवि कवीद्रांची ती अर्धांगी होती. कवीन्द्राची कीर्ती दाहीदिशा आबालवृद्धांच्या मुखातून तिनं श्रवण केली होती. विद्वान सुंदर पती, प्रकांडपंडित श्वशुर. पंडित विरागराजांचं पितृत्व कवीन्द्राला लाभलं होतं. स्मृती, पुराणं त्या वास्तूत वास करून होती. अनेक कूट प्रश्न इथं अविलंब उत्तरले जात होते. विरागराज एक असामान्य प्रतिभेचे पुरुष होते. काव्य त्यांचा प्राण होता आणि अशा पित्याच्या पोटी कवीन्द्र जन्मला होता. आपल्या अमोघ वाणीने आणि कौशल्यपूर्ण काव्यरचनेने विद्वानांना तो मोहून टाकीत असे. शृंगाररसाचं वर्णन त्याच्या मुखानं श्रवण करण्यात श्रोतृसमुदायातल्या स्त्रिया धन्यता मानीत. हे तिला विदीत होतं. तथापि ती सुंदरी मग्नमनसा रहात होती. व्यथित होती. तिचे अंगप्रत्यंग अतृप्तीने विव्हळ होत होते. कवीन्द्र विद्वान होता, सुंदर होता परंतु भोक्ता नव्हता. ही तिची व्यथा होती. आपल्या मदालसेसमान अर्धांगीच्या स्पर्शानं तो प्रफुल्लीत होत नव्हता. तिचं दुःख प्रतिदिनी वर्धित होत होतं. पतीच्या आवेगपूर्ण आलिंगनाचा अनुभव तिच्या शरीरानं अनुभवला नव्हता. तृषा बलवान होती. प्रखर होती. आज तिला त्याच तृष्णेनं बद्ध केलं होतं. काया जणु अचेतनच होती. ती अनिमिष नेत्रांनी आसमंत अवलोकीत होती. प्रासादाच्या अग्रभागी असलेल्या आम्रवृक्षावर एक कपोत युगुल प्रणयाराधनात निमग्न होते. मंडलाकार नृत्य करीत कपोत–प्रिया, प्रियाला क्रीडानार्थ उत्तेजन देत होती. ते कपोत दर्शन घेता घेताच तिची दृष्टी आपल्या स्तनद्वयावर गेली आणि मनमयूर आर्तस्वरात गायला लागला. स्वहस्तांनी ती स्तनमर्दन करायला लागली. कवीन्द्राची स्मृती दावानलांसारखी तिच्या अंगाचे दहन करू लागली. तथापि कुठून तरी तिरस्कार भयप्रद आघात करू लागला. ती शय्यागारात आली. मंचकाबरच्या दर्पणातलं आपलं प्रतिबिंब दृष्टीला आलं तसं इन्द्रियांचा होम प्रज्वलित झाला. नयने स्थिर झाली.

ते लावण्य अलौकिक होतं. केतकीवर्णाची ती तन्वंगी मोहक हास्य करीत होती. पुष्ट नितंबांनी पार्श्वभाग आंदोलत होता. आणि सुरम्य वक्षस्थलांनी यौवनमंदिरावर कलश चढवले होते. मृदुमुलायम कुंतलांचं चुंबन आपल्याला प्राप्त होतं की नाही अशा द्विधावृत्तीत तिचे नितंब व्यथित व्हायचे. विशाल नेत्र चराचर प्राशन करण्यासाठी उत्सुक असायचे. सरल नासिकेच्या समीप ओष्ठद्वयावर गुंजाफलं विराजत होती. क्षणिक लज्जेच्या योगानं त्यांच्यावर अगणित दंताक्रमणं व्हायची. ते पुष्प पूर्ण विकासाच्या मार्गावर होतं. तरीही बीजांडकोष रितेच होते. वसंतकौतुक करायला कोकिलांचं आगमन होत नव्हतं. विवाह होऊन वर्षद्वय झालं. तिला एकच–एक प्रसंग आठवला. मध्यरात्र होती. मचंकावर कवीन्द्र सुखनिद्रा घेत होता. त्याचे अजानुबाहू तिला आवाहन करीत होते. त्याची केशविरहित तनू चुंबनमण्डित करावी म्हणून तिनं प्रगाढ



अनुक्रमणिका

आलिंगन दिलं. त्याच्या कटिवस्त्रानं कटिप्रेम नाकारलं. दोन भिन्न यौवनाविष्कार एकमेकात सामावले. तिच्या सुकोमल ओष्ठद्वयांनी त्याच्या मुखकमलाचा स्वीकार केला आणि तो सचेत झाला. त्याचे नेत्र विस्फारले. नासिका रक्तवर्णांकित दिसू लागली. अद्यापि तिचे आलिंगन दृढ होतं. कुचमल्ली पतीच्या वक्षावर आघात करीत होत्या. लोचने लोचनांशी प्रीतीसंवाद करीत होती. त्याचे ओष्ठ अद्यापि तिच्या दंतव्रणांनी रक्तमंडित झाले होते तसेच होते. शीतल इन्द्रियांचा संग तिची उष्ण इन्द्रिये अनुभवीत होती. पण मनाला मन आलिंगन देत नव्हते. तो उठला.

"तू गतजन्मीची स्वैरिणी असावीस, इतकी अतिरिक्त कामेच्छा विद्वानपत्नीला योग्य नव्हे." तो शय्यागारातून अध्ययनागारात प्रवेश करीत असताना तिनं हे अणकुचीदार अर्थाचे अग्र असलेले शब्द हृदयात धारण केले होते. ते आजही तिच्या कर्णेन्द्रियात निनादत होते. सुस्पष्ट, दग्ध.

"मी स्वैरिणी ! पापिणी ! इन्द्रियजन्य सुख हा मतिविभ्रम ! हे स्वप्न ! मग सत्याचं रूप कोणतं ? पतिसुखाची व्याख्या काय ? अर्धांगी आहे मी, मग स्वतःचं अर्धांग आलिंगण्यात अपराध कोणता ?" अनेकविध प्रश्नचिन्हांनी तिचं हृदयाकाश काजळून गेलं. आणि पुनः ती सज्जात उभी राहिली. चंद्रबिंब आकाशात अत्युच्च स्थळी विराजत होतं. मध्यरात्रीचा पवन निद्रित होता. एकान्त तिला सहन होत नव्हता. कवीन्द्र षण्मासिक कविसभेच्या निमंत्रणानुसार अलका नगरीला गेला होता. शयनागारातला सौम्य प्रकाश तिला अस्वस्थ करीत होता. नखशिखान्त होणारा दाह मुखाद्वारे हुंकारत होता. ती सज्जात आली. सारा परिसर निःशब्द होता. पंडित विरागराज एका घटकेपूर्वीच अध्ययनागारात निद्राधीन झाले होते. प्रासादाचं प्रांगण चन्द्रप्रकाशानं उजळून निघालं होतं. मीलनोत्सुक दंपतीला असलं रोमहर्षक वातावरण किती सुयोग्य. तिनं आपल्या अधरावर दंतव्रण उमटविले आणि ती अहेतुकपणे स्तंभावर विसावली.

सुदूर असलेली गोशाला तिथून सुस्पष्ट दिसत होती. मध्यंतरी नर्मदा होती. शरदातली क्षीण सरिता ती. ती सुद्धा क्षीण सरिताच होती. सागरमीलनाचा अनुभव असूनही अतृप्त, अव्यक्त. पुष्पवती पण फलरहित.

तिचे विशाल नेत्र त्या गोशालेवर स्थिरावले. कविराज कवीन्द्राची ती गोशाला होती. सम्राटानी त्यांच्या प्रतिभेवर लुब्ध होऊन हे गोधन दिलं होतं. आणि त्या गोधनासह श्यामवर्ण नांवाचा गोपाल सम्राटानी दिला होता. कवीन्द्राचा एकनिष्ठ सेवक. पंडित विरागराजांचा त्याच्यावर अपूर्वप्रेमा होता. श्यामवर्ण अविवाहित होता. प्रतिदिनी भोजनार्थ स्वामीगृही यावे, गोरस देऊन पुनः गोशालेत गोपालनासाठी जावे असा त्याचा नित्यक्रम होता.

## अशोक परांजपे

तो बलदंड होता; पण बालसुलभ भावनांचा जणु सुमूर्त पुतळा होता. त्याचे गजशुंडेसारखे बाहू, वज्रासारखी कठोर भासणारी वक्षस्थळं, सिंहासमान कृशकटी आणि अतीव आकर्षक उरू. याचं चिंतन तिच्या मनोमानसी चाललेलं असायचं. अगदी अकारण; पण असायचं खरं. तो गोरसपात्र घेऊन यायचा पण अधोवदनानं सहस्रवेळा तिला मोह झाला की याच्याशी संवाद करावा; पण तो अबोल होता. तिचं अस्तित्व जाणवलं तरी तो लज्जित व्हायचा. दासीकरवी त्याचं भोजनपात्र सिद्ध करताना तिच्या किती वेळा मनात यायचं की आपणच पात्र सिद्ध करून त्याला द्यावं पण ते घडायचं नाही. ती सुद्धा लाजरी होती. प्रांगणात काकरव झाला तरी तिचे हृदय जलदगतीनं स्पंदित व्हायचं. देहाच्या आवरणात तिनं कामयुद्धे केली होती. प्रियाराधन अनुभवलं होतं. स्वप्नातल्या सुखानं तिला मोहनिद्रा आली होती. पण प्रत्यक्ष काही घडत नव्हतं. श्यामवर्ण हा एकमेव परपुरुष तिच्या परिसरात होता. त्याच्याशी संवादसुद्धा दुर्लभ होता. पती विद्वान होता, रसिकता त्याची परित्यक्ता पत्नी होती. ती अहोरात्र आपल्या मनाचं दहन आर्द्र लोचनांनी पहात होती. आज मन अनिर्बन्ध होतं. आज इन्द्रियजय झाला होता. आज सुखाची आसक्ती अणुरेणूत चैतन्य भारीत होती. ती मंत्रमुग्ध झाली होती. गोशाळा दृष्टीसमोर उभी होती. एक, दोन, तीन घटिका झाल्या आणि निश्चयानं ती मंचकापाशी आली. तिनं उत्तरीय घेतलं आणि दासी निद्रिस्त असल्याची स्थिती पाहून उपानह् धारण केली. ती प्रांगणात उतरली. तशी भीतीनं तिच्या अंगांगावर रोमांच आले. श्वशुर विरागराज अध्ययनागाराच्या द्वारातच मंचकावर निद्रा घेत होते.

"हे जागृत झाले तर" तिचं मन तिच्याशी संवाद करीत होतं; पण आसक्ती मार्गदर्शनार्थ सिद्ध होती. ती राजमार्गावर आली आणि विलक्षण वेगानं तिची काया गतिमान झाली. भीतीचं अस्तित्वच नव्हतं. ती मार्गक्रमणा करीत होती पण मध्येच तिची गती मंद मंद झाली. कुणाचा तरी पदरव होत असल्याचा तिला आभास झाला. तिनं सिंहावलोकन केलं अनुचर नव्हता. आणि ती नर्मदेच्या पात्रात प्रवेश करती झाली. शरद ऋतु असला तरी नर्मदाप्रवाह लक्षात येण्याजोगा ध्वनि करीत होता. पहिल्या पदक्षेपाबरोबर एक हिमभावना तिच्या शरीराशी क्रीडा करती झाली. अर्धं अधिक पात्र सरल्यानंतर प्रवाहाची उंची वाढली. तिचा कटिप्रदेश आर्द्र झाला आणि पुन्हा एकदा कामेच्छा प्रज्वलित झाली. प्रवाहाचं भय राहीलंच नाही. स्तनं प्रवाहाचं चुंबन घ्यायला लागली. एक मधुर संवेदना त्या स्थळी निर्माण झाली. इतकं सुखद दुःख तिनं पूर्वी कधी अनुभवलंच नव्हतं. शरीरापेक्षा मनोवेग विलक्षण होता. ती नर्मदापार झाली. आता गोशाला समीप होती. पश्चिम क्षितिजावर अनुरक्त झालेला चन्द्रमा विसावला होता. निःशब्द वायू उत्तररात्रीच्या मीलनार्थ तिच्या सर्वांगावर संचरत होता. ती गोशालेच्या निकट आली. श्यामवर्ण निद्राधीन होता. अवकाशाच्या

भव्य प्रासादात पृथ्वीचा मंचक घेऊन तो भूमिपुत्र निद्रेच्या सुखद आलिंगनात निमग्न होता. त्याचा विस्तीर्ण भालप्रदेश चंद्रप्रकाशात चमकत होता. शरदातल्या रात्रीसुद्धा तो विमुक्त पहुडला होता. त्याची लोहमय काया, भूमीशी एकरूप भासत होती. तो नावाप्रमाणं 'श्याम'वर्ण होता. त्याच्या कटिभागावरचं वस्त्र अगदीच अपुरं होतं. लोहदंडासारख्या आपल्या बाहूवर मस्तक ठेवून तो निद्रिस्त झाला होता. त्याची विस्तीर्ण वक्षस्थळं दृष्टीक्षेपात येताच तिच्या स्तनाग्रातून सुखद वेदना प्रवाहित झाल्या . नितंबांना स्फुरण प्राप्त झालं. ओष्ठद्वय कंपायमान झाले. उत्तरीयाचा त्याग करून ती दोनच पदक्षेपात त्याच्या सन्निध गेली आणि विलक्षण भय तिचं हृदय कंपित करू लागलं. पुन: पदरव आला. तिनं नेत्र विस्फारले. वृक्ष नि:शब्द होते. ती अकारण लज्जित झाली आणि एका विलक्षण आवेगानं तिनं तो 'श्यामदेह' आलिंगनाच्या दृढ बंधनात बद्ध केला. शतश: चुंबनांनी तो नखशिखान्त फुलून आला. ओठ शब्द करते झाले.

"स्वामिनी ! मी सेवक ! य:कश्चित् सेवक'.

आपल्या कोमल हस्तानं तिनं ते मुख अच्छादलं. "अं हं ! मी स्वामिनी नाही. मी अर्धांगी ! अर्ध अंग असलेली. तू अर्धांग मला अव्हेरू नकोस. मी अभिसारिका आहे. दे मला आलिंगन दे." तिचे शब्द वातावरणाला लज्जित करीत होते. चंद्रबिंब गिरीशिखरांच्या पार्श्वभागी गेलं. आणि कामयज्ञाला प्रथम आहुती अर्पण झाली. तिचे सुकोमल अवयव त्याच्या बलवान आलिंगनात तृप्त होत होते. एकाच सुदृढ, प्रदीर्घ चुंबनात ती मोक्षसुख अनुभवीत होती. चुंबनाचं दान–प्रतिदान घडत होतं. चंद्रप्रकाशाचं वस्त्र विरल होत होतं. प्रात:काळाच्या पूर्वीच्या अंध:काराच्या कृष्ण वस्त्रात ते विवस्त्र देह वेष्टिले गेले होते. अस्फुट शब्दांनी आणि मधुर चित्कारानी ती शरद यामिनी मुग्धसुंदरा भासत होती. कधी प्रतिकार, कधी आवेग, कधी वृथा नकार यांनी मीलन आकारत होतं, अद्वैत संचारलं होतं.

पंडित विरागराज एका विशाल कदंब वृक्षातळी राहून ही रतिक्रीडा पहात होते. ते खरोखरच विरागी होते. मानसशास्त्रांच्या व्यासंगानं तो पंडित सहृदय बनला होता. ओठातून शब्द स्फुरले. "इंद्रियांवर वासनांनी मिळवलेला हा अपूर्व दिग्विजय".पंडित विरागराज नर्मदेच्या पात्रात आले. त्यांनी प्रासादाकडे नजर दिली. तो तसाच शांत होता. ते प्रासादात आले आणि त्यांची तनू मंचकावर विसावली. पंचपंच उष:काल झाला. प्रांगणात पदरव झाला. विरागराजांनी दृष्टी दिली नाही. घटका दोन घटकानी सूर्यबिंब प्रकाशमान झालं तसे ते उठले–आणि देवगृहातल्या मूर्तीला वंदन करायला ते देवगृहात आले. ती प्रसन्नवदनानं देवगृहातला रत्नदीप उजळवीत होती. अंगाअंगात तृप्ती नृत्य करीत होती. त्यांना पाहताच तिचे नेत्र पदकमलावर स्थिर झाले. कोकिलरवासारखे शब्द आले :

"आज आपली प्रात:कालची अर्घ्यवेला सरून गेली."

"माझं प्राक्तन. उत्तररात्री एका सुभाषितानं स्मृतीचा पालव धरून वुद्धिछल केला. निद्रा अनावर झाली. अर्घ्यवेला सरली."

"कोणतं सुभाषित ?" अभावित प्रश्न आकारला.

"दिवा काकरवात् भीता। रात्रौ तरति
नर्मदाम् ।

दिनमान असताना काकरवाला श्रवण करून भयभीत होणारी स्त्री, अबला, उत्तररात्री नर्मदापार होते हे कसं ? कवीनं पृच्छा केलीय" पंडित विरागराज क्षीण हसले आणि स्नानगृहात प्रवेश करते झाले. ती मात्र मानरहित होती. अवखळ तरीही तृप्त, पूर्ण विकसीत, पुष्पीत.

• • •


भारताचे नवे 'संरक्षण' मंत्री !

पुढले मूल आत्ता नाहीं



तीन नंतर·कधीच नाहीं

davp 70/152












अनुक्रमणिका



# जिणे ग माझे लाजिरवाणे

—प्रभाकर अत्रे

हॉलीवुडची प्रसिद्ध नटी बार्बारा पेटन हिच्या आत्मकथेचा हा सहावा भाग...तारुण्य संपत आलं की नटीला कोणते उद्योग करावे लागतात याचं विदारक वर्णन तिनं स्पष्ट शब्दात मांडलं आहे ... (या पूर्वीचा भाग 'दीपावली'च्या एप्रिल १९७० च्या अंकात प्रसिद्ध झालेला आहे.)

[७]

आज मी जेव्हां मागे वळून पाहते तेव्हां मात्र लग्नाची मागणी घालणाऱ्या लंडनच्या एका अर्लची आठवण येते आणि मग स्मरतं की मी त्याच्याशी किती क्रूरपणाने वागले होते. माझी घरंगळ सुरू झाली आणि मला पुरुषांचा तिटकारा येऊ लागला असावा. खरं तर त्यातल्याच कित्येकांनी केलेल्या सहकार्यामुळेच मी यशःसोपानाच्या पायऱ्या चढून गेले होते. पण त्याच वेळी एक पाय कुठेतरी खालच्या दिशेनेही उतरतीकडे सरकत असावा असंही मला आता वाटतं.

काही काही वेळा पुरुषांकडून मला जी वाईट वर्तणूक मिळाली त्याचे दायित्व माझ्यावरच आहे हे मला कळतं. मी मुद्दामच त्यांना डिवचत असे. संतापून त्यांनी शिक्षा केली की मला बरं वाटायचं. त्यांनी अशी शिक्षा केली की मी आणखी क्षुद्रतेने वागू लागत असे.

टॉम नीलचे माझ्यावर प्रेम होते. त्यासाठी तो युरोपमध्ये मला मुद्दाम भेटायला यायचा पण त्याच वेळी मला लग्नाची मागणी घालणाऱ्या ह्या अर्लबरोबर मी भटकत होते. त्याच्याबद्दलही मला खास आकर्षण होते अशातला भाग नाही. टॉमबद्दल मला आशा नव्हती तरीही त्याच्यावर माझे प्रेम होते. मी त्याच्याबरोबर हॉटेलमध्ये रहात होते.

एके रात्री मी चार दोन पेग घेतले आणि त्याला म्हणाले, "टॉम, मला कदाचित यायला उशीर होईल. तू झोपलास तरी चालेल. आज तुला मी एक आश्चर्यजनक भेट देणार आहे."

अर्ल माझ्या घरी आले नव्हते. मीच त्यांच्या महालात वारंवार गेले होते. त्यांना माझी कल्पना फार आवडली. आम्ही हॉटेलच्या खोलीत आलो तेव्हा टॉम बहुधा झोपलेला असावा. आम्ही अग्निकुंडाच्या बाजूला बसलो. अर्ल पेटले. त्यांनी मला जवळ घेतलं तेव्हा त्यांच्या माझ्या प्रणयक्रीडांचा जास्तीत जास्त आवाज होईल अशी दक्षता मी घेतली. टॉमने यावे व मला दुसऱ्या एका पुरुषाच्या मिठीत गुंफलेले पहावे असे मला मनोमन वाटत होते. त्यातून मला नेमके काय साधायचे होते वा सिद्ध करायचे होते ते मला अजूनही कळले नाही.

त्या रात्री आपली पॅण्ट तिथेच टाकून अर्ल पळून गेले. टॉमने मला बेदम मारले. पण मला त्याची पर्वा नव्हती. त्या प्रसंगातला प्रत्येक क्षण मी भोगला होता. त्याची तृप्ती मी प्याले होते.

कामे कमी मिळाली की पुरुषांशी क्रूरतेने वागत होते. कधी कधी मला माझ्या वागण्याचा पश्चात्ताप होई. मग मी त्या पुरुषांना भेटी पाठवीत असे, किंवा कधी त्यांची सपशेल माफी मागत असे; परंतु काही पुरुष इतके चक्रम असत की ते आपल्या पद्धतीने सूड उगवल्याशिवाय रहात नसत.

एखाद्या माणसाला — पुरुषाला दुसऱ्या पुरुषासमोर हीन करून टाकणं, त्याचा लोळागोळा करणं यासारखी भयानक गोष्ट नसते. अनेक पुरुषांबाबत मी हे केले. काही काही गोष्टींबद्दल तर काही

अनुक्रमणिका

सांगायला–बोलायला सुद्धा मला लाज वाटते इतक्या त्या भयानक आहेत.

१९५३ सालची न्यूयॉर्कमधली ती रात्र मला अजूनही स्मरते. खूप उकाडा जाणवत होता. हॉटेलच्या खोलीत बसवत नव्हतं. म्हणून मी टॉमला तसंच सोडलं आणि बाहेर पडले. तेवढ्यात एक तरुण काऊ बॉइज्चा घोळका मला दिसला. मला पाहताच त्यातल्या एका उंच, देखण्या पोराने आपली हॅट माझ्याकडे फेकली. मी ती घातली. त्या साऱ्यांनी टाळ्या पिटल्या. ते सारे मला ओळखत होते. मग मी त्यांच्या बरोबर त्यांच्या हॉटेलवर गेले. ते सहाजण होते. मी एकटी होते. मद्यपान झाल्यावर मी माझी पादत्राणे फेकून दिली आणि त्यांच्या पुढ्यात नाचू लागले. नंतर मी एकेकाला बरोबर घेऊन नृत्य केले. त्यामुळे त्यांच्यातली द्वेषभावना पेटली. माझं काम सोपं झालं. त्या मुलांना एकमेकांच्या विरुद्ध उभं करणं आणि त्यांची मारामारी मजेने पहात बसणं मला हवं होतं. असं कां वाटलं त्याचं कारण मला सांगता येणार नाही. हे करता येऊ शकणं एवढंच सिद्ध करण्याचा कदाचित माझा हेतु असेल.

पहाटेचे दोन वाजले होते. तेवढ्यात ज्या तरुणाने मला टोपी दिली तो माझ्याजवळ आला आणि कानात कुजबुजत म्हणाला, "माझ्या खोलीत येशील ?"

इतरांना ऐकू जावं म्हणून मोठ्याने मी उत्तरले, "तुझ्या खोलीत मला नंतर येता येईल. इथे मजा येते आहे".

### आमची पोरगी पळवतोस काय ?

ही काडी उपयोगी पडली. त्यांच्यातलाच एकजण त्या तरुणाच्या अंगावर धावत जाऊन म्हणाला "अरे, चोरा, आमची पोरगी तुझ्या खोलीत यायला हवी काय ? पाठीत लाथच घालतो."

इतरांनीही त्याला पाठिंबा दिला. त्यांची ती सुंदोपसुंदी पाहून मला बरं वाटलं. मी मस्तपैकी कोचात पाय ताणून पडून राहिले. आपल्यासाठी सुन्दर, तरुण पोरं आपापसात भांडताहेत, झगडताहेत हे पाहण्यात तुफान मजा होती. हॉटेल मॅनेजरने मात्र पोलिसांना फोन केला. एका पोलिसाशी मी इतकी लडिवाळपणाने वागले की, त्याने आपल्या रिपोर्टात लिहिलं की, मी दुसऱ्याच एका माणसाची पाहुणी होते. साऱ्या पोरांना अटक झाली.

परत येताना मी मजेत होते. गात होते. हसत होते. मला जे साधायचे होते ते मी साधले होते.

पुढे रिल्टो थिएटरला माझं पिक्चर लागलं तेव्हा त्या पोरांनी त्या थिएटरपुढे निदर्शनं केली व घोषणा दिल्या, "बार्बारा पेटनला पाहू नका" खाजगीतल्या एका 'विनोदा'ने मला उलट अधिकच प्रसिद्धी मिळाली.

पुढे त्यातला एकजण मला भेटला. म्हणाला "त्या रात्री मजा आली. ती रात्र आम्ही जेलमध्ये काढली." त्यांच्या मनात कटुता उरली नव्हती.

पण नेहमीच सारं इतक्या निर्धोकपणे पार पडत नाही.

"ड्रम्स इन द् डीप साऊथ" ह्या माझ्या चित्रपटाच्या उद्घाटनानंतरच्या पार्टीच्या वेळी मला एक देखणे जोडपे दिसले. आपल्या पत्नीविषयीची मूर्तिमंत असूया त्या पुरुषाच्या अंगांगातून थयथयत होती तर भेटलेल्या प्रत्येक पुरुषावर आपली छाप पाडण्याचा त्या स्त्रीचा प्रयत्न होता.

माझ्या मनातला सैतान जागा झाला. वाटलं ह्या प्रमाथी व्यक्तित्वाच्या स्त्रीलाही काही धक्के देऊन बघावेत. कुणालाही मोहवील, खिळवून टाकील असा गाऊन मी घातलेला होता. त्या पुरुषाला मी माझी सिगरेट पेटवायला सांगितली. आणि त्या क्षणातूनच सारी भानगड उपस्थित झाली. त्या माणसाचं नाव होतं **ग्रेग सरम्पल्**. वय वर्षे चाळीस. निवृत्त. पत्नीचं वय असावं एकवीस !

"तू कित्ती कित्ती सुन्दर आहेस" असं त्याला वारंवार ऐकवत मी त्याच्या बरोबर नृत्य करू लागले. नृत्य करताना मी त्याच्या अधिक जवळ गेले. त्याचं धैर्य वाढलं. त्याने कंबरेत हात घातला. मला जवळ घेतलं. तशाच अवस्थेत आम्ही बाल्कनीत गेलो. त्याने माझे चुंबन घेतले. नृत्य चालू असताना त्याची पत्नी पहात होती. नंतर ती बाल्कनीतही आली. तिच्या बरोबरही एक पुरुष होता. पण ग्रेगला तिच्यात आणि त्याच्यात काहीही रस नव्हता. तो मला मिठीत घेत होता. चुंबनात त्याला अधिक रस होता.

तीही काही कमी नव्हती. हे सारं पाहून तिने आपल्या मित्राच्या पाठीवर जोराने थाप मारली. त्या आवाजाने ग्रेग सावध झाला. त्याची मिठी सैल झाली. तो तिच्यामागे धावला. तिने त्याचे चुंबन घेतले आणि ती निघून गेली.

शेवट गोड झाला असं मला वाटलं.

पण – त्यानंतर लवकरच दोघांनी घटस्फोट घेतला. त्यानंतर कितीतरी दिवस ग्रेग मला लग्नासाठी मागणी घालीत राहिला. शेवटी मी एरॉल फ्लिनशी लग्न करणार आहे असं त्याला सांगितलं– उगाच ! पण त्या युक्तीचा उपयोग झाला. मी वचनबद्ध होते. यापुढे तो संतापला. पण त्याने मला भेट पाठवली–निरोपाची ! कदाचित त्याच्या पत्नीच्या तावडीतून त्याची कायमची सुटका करण्याची कृपा मी त्याच्यावर केली म्हणूनही असेल ! त्याची पत्नी म्हणजे एक हडळ होती हडळ ! !

पुरुषांना माझं फक्त शरीर हवं होतं. आणि मला नेमका त्याचाच तिटकारा होता. मला प्रेम हवं होतं. हृदयाचं प्रेम – शरीराचं आणि शरीरापुरतं नव्हे ! !

त्यामुळेच एखाद्या पुरुषाला नुसता माझ्या शरीरातच रस आहे असं वाटलं तर मी त्यांना तेवढ्यापुरतंच जवळ येऊ देत असे. त्यात फरक करण्याची मुळी मला गरजच वाटली नाही.

### स्त्री म्हणजे एक आईसबर्ग ...

हॉलिवुडमधील चित्रपटाच्या क्षेत्रात ज्यांची चलती असते अशा देखण्या तरुण मुलींना लग्नाच्या मागण्यांना तोटा नसतो. त्यातल्या काही प्रामाणिकही असतात. परंतु बऱ्याचशा मागण्या शय्यासोबतीच्या अभिलाषेने केलेल्या असतात. तासाभराच्या परिचयाने पुरुष एकदम लग्नाची मागणी कशी घालू शकतात याचं कोडं मला अजूनही उलगडलं नाही.












मला वाटतं स्त्री म्हणजे एक आइसबर्ग आहे. अथांग जलाशयाच्या वर जेवढा भाग दिसतो तेवढाच भाग सत्य असं मानून चालणार नाही. पाण्याखाली लपलेला भाग शोधून काढायला, त्याचं रूप समजून घ्यायला खरं तर काही महिने–काही वर्ष जावी लागतात.

मला एका आठवडचात सहा जणांकडून लग्नाची मागणी घातली गेली. मला असली मागणी घालणाऱ्या पुरुषांची मनस्वी चीड येते. त्यांना हवी असते फक्त शय्यासोबत! काम झालं की, मग त्यांना फोनवर गाठणं सुद्धा अशक्य होऊन जातं.

गॅरी कूपरबरोबरचे माझे "डलास" ( Dallas ) नावाचे एक चित्र पूर्ण झाले होते. एक दिवस मी हॉलिवुड ब्राऊन डर्बीच्या अमेरिकन रूममध्ये बसले होते. तेथे एक तरुण अभिनेता मला भेटला. त्याचे एका तरुण नटीशी लग्न झाले असल्याची वदंता होती. तो ती नाकारीत होता; पण ते सत्य होते असे पुढे सिद्ध झाले. तो माझ्याजवळ आला. माझा हात हाती घेऊन माझ्या डोळ्यात रोखून पहात म्हणाला, "आपण सागरतीरी भटकायला जाऊ या का?"

आम्ही तेथे गेलो. त्याने मला आपली सारी खरी-खोटी जीवनकथा ऐकवली. आणि त्याच्या जीवनातला निर्णायक क्षण येऊन ठेपला होता. त्या क्षणाची मी स्वामिनी होते. मला तो सोडणार नव्हता. तो मला भावनावेगाने म्हणाला, "बार्बारा, तू माझी पत्नी व्हावीस असं मला वाटतं. माझं तुझ्यावर प्रेम आहे. हा जादूने मंतरलेला क्षण माझ्या आयुष्यात आला आहे. लग्न करशील?"

मीही सरळ सरळ डाव खेळायचं ठरवलं. मी त्याला म्हणाले "जॉन, माझंही तुझ्यावर प्रेम आहे. मला तुझी पत्नी व्हावंसं वाटतं. कधी करू या लग्न?"

त्याला आश्चर्य वाटलं असावं. तो म्हणाला, "पुढल्या बुधवारी करू या का?"

"आजच रात्री काय हरकत आहे? एखाद्या जे.पी. ला उठवू. लग्नबंधन बांधू आणि वृत्तपत्रांना वार्ता कळवून टाकू. भरपूर जागा देतील ते लोक".



त्याला ते आवडणार नाही हे मला ठाऊक होतं. तो म्हणाला, "घाई होतेय् असं नाही तुला वाटत? रविवारी करू या हवं तर!"

"हरकत नाही–कल्पना वाईट नाही. पण त्या संबंधीचे कागदपत्र आजच मागवून घेऊ या आणि वार्ताहरांनाही बोलावून घेऊ या" तो हे करणार नाही हेही मला ठाऊक होते.

"आपण रविवारी लग्न करू आणि मग देऊ की ती वार्ता वृत्तपत्रांना" तो म्हणत होता.

तो सापळा होता. त्याला हवी होती फक्त त्या रात्रीची शय्यासोबत! काही तरी करून ते साधले की तो भांडण काढणार होता. लग्नाची कल्पना आल्यावर उडून जाणार होती. पण मी शहाणी झाले होते. पुरुषातल्या ह्या लांडग्यांचा मला पूर्ण परिचय झालेला होता.

तो म्हणाला, "आपण दोघंही खूप कामात असतो. सव गोष्टी नीट पार पाडायला काही दिवस लागतील. आपण एक महत्वाचं पाऊल टाकतो आहोत. माझं तुझ्यावर प्रेम आहे आणि तुझंही माझ्यावर आहे असं मला वाटतं. मग लग्नासाठी काही दिवस थांबावं लागलं तर काय बिघडलं?"

"नाही राजा, मला थांबावंसं वाटत नाही. आपण आताच जाऊ आणि लग्न करून घेऊ".

"उद्या करून टाकू या लग्न"

मी नकारार्थी मान हलवीत म्हणाले, "कदाचित मी फार कठोरपणाने वागते आहे असं तुला वाटेल. पण खरं सांगू, असा भाग्याचा क्षण माझ्याकडे कधीतरी चालत येतो. तो मला साधला पाहिजे".

त्याला मी बांधून ठेवले होते. त्याचा खेळ मी ओळखला होता. तो म्हणाला "बार्बारा, मला तुझी खूप ओढ लागली आहे. मला तुझ्याजवळ यायचं आहे. जगात फक्त तू आणि मी – साऱ्या गोष्टी विसरून जा! लग्नाचं आपण नंतर शनवार–रविवारी ठरवू. मला ती जागा ठाऊक आहे. जायचं अन् मग लग्न उरकायचं. तुला काय वाटतं?"

मला हसावसं वाटलं, पण हसले नाही. त्याला म्हणाले, "पण लग्न झालं की मला सुरक्षितता लाभेल. कुठलीही स्त्री असंच मागेल, नाही का?"

"माझ्यावर विश्वास नाही तुझा? लग्न करीन म्हटलं की लग्न करीन – विश्वास ठेव."

"विश्वास आहे रे! पण मला काळजी घ्यायलाच हवी, नाही का?"

"तुझंही बरोबर आहे. आपण असं करू या. लोएला व हेडांना आपण बोलावून घेऊ. लग्नाचा विचार त्यांना सांगू. तुला बरं वाटेल?"

मला ह्या साऱ्या डावांचा परिचय होता. लग्नाची नुसती घोषणा करायची. काही तासांनी ती मागे घ्यायची. मला त्या खेळाचा वीट आला होता म्हणून मी त्याला म्हणाले, "बस् झालं हे! जर आपण




लग्न करणारच असू तर आताच करायचं नाहीतर मला घरी सोडून दे पाहू".

खरं म्हणजे लाख डॉलर्स घेऊनही मी त्याच्याशी लग्न केलं नसतं. त्याला राग यावा असं मला वाटत होतं. पण तो रागावला नाही. पण दुखावल्यागत म्हणाला, "ठीक आहे. तुला हेच हवं असेल तर आपण निघू या".

आम्ही निघालो. घराच्या दिशेने गाडी जात नव्हती. मी तसे म्हणताच तो म्हणाला, "मी तुला नव्या जागी नेतो आहे. तेथे आपण मद्य घेऊ अन् मग जाऊ".

मी मानलं ते. त्याला आणखी एक संधी द्यावी असं मला वाटलं.

आम्ही एका जलनौकेत गेलो. मी एकच चषक घेतला. त्याने मात्र भरपूर मद्य घेतले. आणि मग माझ्या डोळ्यात रोखून पहात तो म्हणाला, "मला शय्यासोबत देतेस की नाही ? कोण समजतेस ग तू स्वतःला ?"

मला असला अनुभव नवीन नव्हता. त्यामुळे मी घाबरले नाही. मी हसले आणि त्याला त्याच्याच परिभाषेत उत्तर देत म्हणाले, "तुझ्यासारख्या रानटी, पशु वृत्तीच्या माणसाला नकार देण्यासाठी मला कुणाचं रूप घ्यायला हवं ? तुला माझ्या अंगाला हात लावायची संधी देण्यापेक्षा मी मरण पत्करीन हे सांगण्यास मला आनंद होतो आहे".

"मग मरच" तो नाटकीपणाने म्हणाला.

मी उठून चालू लागले. त्याने माझा रस्ता अडविला, "कुठे चाललीस ?"

"घरी !" असं म्हणत मी एक बाटली उचलली "बाजूला हो, नाही तर तुला हिचा प्रसाद मिळेल".

तो भित्रा होता. त्याला खात्री पटली असावी की मी ती बाटली त्याच्या टाळक्यात घालीन. त्याने माघार घेतली. "मी घरी पोहचवतो" तो म्हणाला.

त्याने घरी पोहचवलं. गाडीत आम्ही एकही शब्द बोललो नाही. त्याने गाडीतूनच निरोप दिला. प्रकरण संपलं. मी त्याचं नाव सांगणार नाही कारण तो विख्यात अभिनेता झाला आहे.

* * *

## 'असं कां ?' या प्रश्नाचं उत्तर सांपडत नाही

माणसाची घरंगळ कशी सुरू होते व केव्हा सुरू होते, हे त्याचे त्यालाच कळत नाही. थिएटरबाहेर 'स्वाक्षरी'साठी थांबणारांची संख्या हळुहळू कमी होत जाते. स्टुडियोतले अधिकारी इकडून तिकडे जात येत असतात, पण तुमची दखलही त्यांना नसते, बँकेतल्या खात्यातली रक्कम कमी कमी होत जाते. तुमचे एजंट तुम्हाला चित्रपट - कथा कमी संख्येने पाठवू लागतात. आणि मग तुम्ही आरशात पाहता —

तुमचे सौंदर्य कमी झालेले असते. रूप पालटले असते. "असं कां ?" ह्याचं उत्तर तुम्हाला ठाऊक नसतं; पण आयुष्यात असं घडतं — अपरिहार्यपणे !

मग वाटेल ती कामे तुम्ही पत्करता. तीच किती व कशी चांगली कामे आहेत याची वकिली करू लागता. घडी विस्कटलेली असते. कटुता वाढत जात असते. 'असं कां ?' या प्रश्नाचं उत्तर मिळत नाही. 'करिअर'ची चिंता कळत नकळत आत्मघाताकडे खेचून नेत असते. मग तुम्ही जरा अधिक मद्य घेऊ लागता. मग गोळ्या घेऊ लागता. झोपेच्या गोळ्या, वासनेच्या गोळ्या, गुंगीच्या गोळ्या, सूडाच्याही गोळ्याच — कशाही गोळ्या आणि कितीही गोळ्या. येवढंच उरतं

बाकीची उपेक्षा, बाकीचे आघात माणूस सहन करू शकतो. पण करिअर ? एक निर्माता मला म्हणाला, "तुझे चित्रपट आता गल्ला जमा करीत नाहीत. तू स्थूल होत चालली आहेस. निवडीची संधी मिळाली तर तुझ्या निवडीबाबत विचार करावा लागेल."

पण अशा तऱ्हेचा प्रामाणिकपणा तुम्हाला हॉलिवुडमध्ये दिसणार नाही. त्याला ते मुत्सद्दीपणा म्हणतील किंवा असं बोलून तुमच्या भावना दुखवा कशाला असं मत ते व्यक्त करतील.

सत्य हे कशाही स्वरूपात समोर येऊन उभं राहिलं तरी एकूण स्वीकारायला तसं जडच !

'ऑफ् ह्यूमन बाँडेज'चे पुनर्चित्रण होणार होते. त्यातली वेट्रेसची भूमिका मला फार आवडली होती — मूळ चित्रात ती भूमिका **बेटी डेव्हिसने** केली होती. मला ती भूमिका हवी होती. त्यासाठी मी निर्माता, दिग्दर्शक यांना विचारलं — नकार मिळाला. त्यांना जेव्हा मी हवी होते तेव्हा ते माझ्यासाठी भूमिका लिहवून घेत होते — क्वचित प्रसंगी योग्यायोग्यतेचा विचारही न करता ! पण आता माझ्या योग्यतेची भूमिका त्यांना सापडत नव्हती.

**'बेटी डेव्हिस'**सारखा मेकप करून मी फोटो काढवून घेतले. व ते निर्माता-दिग्दर्शक याजकडे पाठविले. पण उत्तरही आले नाही.

मग मी लेखकाला गाठले. त्याला माझा सहवास हवा होता हे मला ठाऊक होतं. त्याला घेऊन मी जेवले. मद्य घेतले आणि

अर्थमंत्रिपदाचा 'अर्थ'






अनुक्रमणिका

कसाईखान्यात नेल्या जाणाऱ्या शेळीप्रमाणे त्याच्या घरीही गेले. त्याला मी ह्यी भावना सांगितली. त्याने फोनवर प्रयत्न केले. पण —

यश आलं नव्हतं तरी त्याने प्रयत्न तर केलेच होते. त्याचं मोल मला मोजायलाच हवं होतं. मी ते मोजलं. मला ती भूमिका मात्र मिळाली नाही ती नाहीच !

घरंगळ सुरू झाली तरी घरभाडं, अन्न, कपडे आणि मद्य यांची बिलं भरावीच लागतात. मद्य महत्त्वाचे ! ते नसेल तर तुम्ही, चोवीस तास पहिल्या तीन गोष्टींची विवंचना करीत बसणार.

मग येतो शरीरविक्रय ! मनाची समजूत कशीही घाला तुम्ही पण समजूत पटत नाही. सत्य काही बदलत नाही. विचार ! विचार! विचार ! ! कधी तरी जाग येते. यायलाच हवी असते. मला कशी आली ते सांगू ?

माझ्यापेक्षा वयाने बराच लहान असा एक गायक-नट होता. तो माझ्यावर फिदा झाला होता. लग्नाची मागणीही घातली त्याने. पण तो लहान होता . . . सहवासाला बरा होता. आम्ही काही सफरी एकत्र केल्या होत्या. त्याला मी जे सहवास सुख देत होते त्या बदल्यात तो काही द्रव्य मला देत होता.पण त्याची एक मजेशीर पद्धत होती. मला न सांगता, मला न दिसेल अशा पद्धतीने तो ते द्रव्य माझ्या पाकिटात किंवा हॅटखाली ठेवून देत असे. आमचा रोमान्स चांगला रंगला होता. मला तो आवडू लागला होता. एकदा आम्ही लॉस-वेगासला गेलो. मजा केली. परतलो. मी नेहमीप्रमाणे त्याने ठेव-लेल्या पैशांची शोधाशोध केली. मिळाले नाहीत. मी त्याला म्हणाले "तू मात्र दिलेले पैसे बहुधा कुठेतरी हरवले वरं का ?"

"तुझे पैसे हरवले नाहीत. कारण मी ते ठेवलेच नव्हते. मला खात्री करून घ्यायची होती की एका मैत्रिणीवर प्रेम करीत होतो की एका वेश्येवर ? मला उत्तर मिळालं."

मला धक्का बसला. मी संतापले. आणि त्याला म्हणाले "मी तुला शय्यासोबत दिली ती तू मला आवडत होतास म्हणून. मला तसं वाटलं म्हणून. मुलगा असून एखाद्या पुरुषासारखं वागण्याची तुझी धडपड पाहून मला वाईट वाटायचं. दया यायची तुझी आणि म्हणून मी तसं वागले. लाख रुपये दिलेस तरी मी आता पुन्हा ते करणार नाही".

"लाख रुपये तुझ्यावर खर्च करण्याची कल्पना सुद्धा मला सहन होत नाही." तो उत्तरला. मी फोन ताड्‌कन बंद केला. आणि मी विचार करू लागले. अखेर मी होते कोण ? बदचालीची मुलगी, वेश्या ? की कॉलगर्ल ? "नाही ! नाही ! !" असं उत्तर मी दिलं खरं, पण मी जमाखर्च मांडला. मी शरीरविक्रयच करीत होते. म्हणजे मी —

उत्तराने मी दचकले. मला काहीतरी निर्णय घ्यायलाच हवा होता. लहान-सहान कामे मिळत होती. पण हे असलं आयुष्य —

मात्र विचार करायलाच हवा होता आणि कृतीही ! ! मी मेक्सिकोला गेले.

(क्रमशः)





अनुक्रमणिका

अनुक्रमणिका









## सारे एकसारखे

भारत-चीन युद्धात एका चिनी सैनिकाला पकडण्यात आलं. लष्कर-अधिकाऱ्याने त्याला प्रश्न केला, "काय नाव तुमं ?"

"त्यू-शुन-सिंग", त्याने उत्तर दिलं.

"बापाचं नाव ?"

"युन तू शिंग"

"मुक्काम ?"

"नान किंग"

"पकडणाऱ्याचं नांव ?"

"निहालसिंग"–पाठीमागून आवाज आला.

## विचित्र पदवी

"सरदारजी, आपलं नाव काय ?"

"लॉर्ड करतारसिंग."

"क्षमा करा. आपल्या देशाला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर नावापुढे इंग्रजी किताब लावण्याचा प्रघात नसूनसुद्धा तुम्ही 'लॉर्ड' हा किताब लावता. हे कसे काय ?"

"त्याचं असं आहे," सरदारजींनी खुलासा केला, "मी मूळचा सिंध प्रांताचा. तिथे मी 'लॅंडलॉर्ड' होतो. फाळणीनंतर माझी 'लॅंड' पाकिस्तानात गेली आणि माझ्याजवळ 'लॉर्ड' राहिले. म्हणून मी आपल्या नावासमोर 'लॉर्ड' लावतो."

## योग्य उत्तर

मास्तरीण—दूध नासू नये म्हणून काय करावं ?

एक मुलगी—दूध गायीजवळच असू द्यावं.

## दूरदर्शीपणा

रस्त्यावर एक सद्‌गृहस्थ एकाएकी कोसळून पडले आणि बेशुद्ध झाले. त्यांना रुग्णालयात नेण्यात आले. तेव्हा तपासणीच्या वेळी त्यांच्या खिशात एक चिठ्ठी सापडली. तिच्यात लिहिले होते–"ही साधी मूर्च्छा आहे. अपेंडिसायटिस नव्हे ! माझे अपेंडिक्स पूर्वीच कापून टाकण्यात आले आहे. एकदा नव्हे–दोनदा. पुन्हा-पुन्हा ते ऑपरेशन नको !"

## प्रात्यक्षिक

एका रेडिओ स्टेशनमध्ये श्रुतिकांकरिता एका पुरुष पात्राची आवश्यकता होती. इंटरव्ह्यूकरिता बऱ्याच तरुणांना कॉल गेला होता. एका रुबाबदार तरुणाला अधिकाऱ्यांनी प्रश्न केला, "काहो तुमची हॉबी काय ?"

तरुण — नाटकात काम करणं !"

अधिकारी — तुम्ही एखादा प्रयोग करून दाखवाल काय ?"

तरुण — अवश्य !

आणि तो तरुण लगेच बाहेर येऊन इंटरव्ह्यूकरिता आलेल्या इतर उमेदवारांना जोरात म्हणाला, "सॉरी. तुम्ही आपापल्या घरी जाऊ शकता ! कारण या जागेकरिता माझं सिलेक्शन झालं आहे !"

त्या उमेदवारांना खरं वाटून ते सर्व आपापल्या घरी गेले. आणि त्या तरुणाची निवड झाली, हे सांगावयास नकोच !

## आज्ञापालन

एका चिनी कॉर्पोरलला त्याच्या बरोबर काही सैनिक देऊन रशियाचं एक रेल्वे-स्टेशन उडविण्याचं काम दिलं.

दुसऱ्या दिवशी त्या कॉर्पोरलने रिपोर्ट दिला, "मी सर्व तिकिटे जाळून टाकली. आता त्या स्टेशनाचा काहीही उपयोग नाही."

## आमची हरकत नाही

एकदा विन्स्टन चर्चिल यांना त्यांचा सेक्रेटरी म्हणाला, "सर, सोव्हिएट पंतप्रधानांचं पत्र आलं असून त्यांनी माउंट एव्हरेस्टवर ब्रिटिश ध्वज लावल्याबद्दल निषेध व्यक्त केला आहे. कारण एव्हरेस्ट हे ब्रिटनच्या हद्दीत नाही."

चर्चिलनी उत्तर दिलं, "त्यांना कळवा की तुम्ही आमचा ध्वज काढून त्या जागी आपला ध्वज लावावा. त्याला आमची मुळीच हरकत नाही."

## डायरीतील पाने

आगबोटीनं दूरच्या सहलीला गेलेल्या एका तरुण स्त्रीच्या डायरीत पुढीलप्रमाणे नोंद आढळली —

सोमवार — आज कप्तानाची नि माझी ओळख झाली. गृहस्थ उमदा आहे.

मंगळवार — आज कप्तानानं मला चहाला आमंत्रण दिलं. खूप गप्पा झाल्या।

बुधवार — आज कप्तानानं मला खान्याला आमंत्रण दिलं. चांदण्यातलं भोजन मस्त होतं.

गुरुवार — आज कप्तानानं मला नृत्याला बोलावलं. नृत्यही तो चांगलं करू शकतो. आज तो खूप आनंदात होता.

शुक्रवार — आज तो अधिकच सलगी दाखवू लागला. त्याचा हेतु मला कळून चुकला आणि मी माझ्या केबिनमध्ये पळाले.

शनिवार — आज त्यानं माझी पुन्हा भेट घेतली, तो मला म्हणाला, "उद्या तू माझ्या म्हणण्याला रुकार दिला नाहीस, तर दोन हजार उतारूंसह ही बोट मी बुडवून टाकीन."

रविवार — आज मी दोन हजार उतारूंचे प्राण वाचवले !

— श. शि. पेंढारकर






## अनुभवसमृद्ध कथासंग्रह

आजच्या मराठी कथेचे विश्व जरी विस्तारलेले असले तरी अनेक कथालेखक स्वतःवरती काही बंधने घालून घेतात. प्रादेशिक कथा लिहिणाऱ्या लेखकांच्याबाबत तर ही बंधने आपोआपच येतात. अर्थातच एकंदर वर्णन जरी अधिक वास्तव झाले तरी त्यातील विविधता कमी होते आणि-शिवाय एका लहान चाकोरीतच ते कथाकार फिरताहेत असे वाटते.

या सर्व दोषांना टाळून समाजातील विविध थरांचा, निरनिराळ्या वयाच्या नि प्रकृतीच्या माणसांचा, त्यांच्या अनुभव नि घटनांचे चित्रण करण्यात खूपच चांगले यश श्री. दा. पानवलकर यांना त्यांच्या 'औदुंबर' या कथासंग्रहाने मिळालेले आहे.

निरनिराळ्या परदेशी वस्तू जकाती चुकवून आणावयाच्या नि विकून खूप काळा पैसा उभा करावयाचा, चैन करावयाची हा काही जणांचा व्यवसाय बनला आहे. दारूच्या चोरट्या व्यापारामुळे काहींचे उखळ पांढरे झाले आहे. या मंडळींपकी 'अच्युत' एक आहे. त्याच्या साहसी जीवनाचा परिचय पानवलकरांनी 'यापरि सांडुनि दमयंती' या दीर्घ कथत करून दिला आहे. उच्च कुळात जन्म, जन्मजात धाडसी प्रवृत्ति असल्याने या काळ्या व्यवसायातही तो लवकरच यश मिळवतो. त्याचा संसार, त्याचा व्यवसाय, त्याची सहनशील पत्नी आणि मुलं, तापट आई, गुन्हा सापडत नाही म्हणून अच्युतला गाठणारे पोलिस इन्स्पेक्टर व अच्युतच्या पौरुषावर फिदा असलेली कुमुद या सर्वांचा परिचय या कथेत तपशीलवार नि कलात्मकरीत्या लेखकाने घडवलेला आहे.

या पद्धतीनेच मुंबईच्या भेंडी बाजारातील जीवनही 'सर्च' या कथत रेखाटले आहे. मराठी कथाविश्वाला अपरिचित असलेले जग या कथत आलेले आहे. चित्रण फारच प्रभावी आहे.

'सर्च'मध्ये पोलिस अधिकाऱ्यांना जरी अपयश आलेले असले तरी 'बगळा' या कथेत मात्र त्यांना गुन्हेगार पकडण्यात यश आलेले आहे. 'बगळा' म्हणजे दर्यावर असलेल्या मकाणासारखी बोट. हिच्यातून सोने




**औदुंबर • वाटचाल • सैनिकाची बखर**

इत्यादि वस्तू जकात चुकवून मुंबईत येत जात. पोलिसांना किती कष्ट करावे लागतात नि किती तत्पर असावे लागते आणि मोहाचे डोंगर पुढे कसे उभे केले जातात याचे चित्र या कथेद्वारा उभे राहाते. इतक्यातूनही एखादा 'सॉलोमन' 'अबदुल्ला सुलतान'ला पकडतोच. संघर्ष, संभाषण व साहसी प्रसंग या कथेत प्रभावीपणे रेखाटले आहेत.

'आडवा बोळ'ही शहरातलाच. या कथेतील निळूही लक्षात राहाणारा आहे. 'आडवा बोळ' त्याला त्या बोळाने जाण्याची मनाई केल्याने त्याच्या कुतुहलाचा विषय बनला होता. हा बोळ पहाण्याचा त्याला योग येतो. गोकुळा या वेश्येची त्याची गाठ पडते. तिने हाक मारल्याने छाती धडधडत प्रवेश करणारा निळू व तिने वाचावयास दिलेले पत्र या प्रसंगातूनही वाचकाच्या मनात गोकुळाविषयी सहानुभूतीच्या तारा छेडल्या जातात.

'उगीच' मधील कथाविश्व लहान मुलीच्या जिज्ञासेभोवती गुंफलेले आहे. तिच्या चौकशीमुळे चिडलेली आई लहान मुलीच्या विश्वातील व मनातील संघर्ष व प्रश्न याचे एक छानदार चित्र या कथेत टिपलेले आहे.

'बार' ही कथा अशीच थोडीशी चेहऱ्यामोहऱ्याने निराळी. यातील 'गणेशा' फारच दुबळा आहे. पण त्या मानाने आजोबा फारच तडफदार आहेत. लागोपाठ व एकाच बैठकीत तीन मुली गणेशाला दाखवून त्या तिन्ही गणेशाशी लग्न करण्यास तयार असल्याची बातमी आणणारे आजोबा त्याच्यातील या अमाप उत्साहामुळे लक्षात राहतात. गणेशाचा दुबळेपणा मात्र केविलवाणा आहे. पण 'उन्हाची रात्र' मधला गणेश मात्र दुबळा असूनही पराक्रम गाजवतो. गणेशाचे मन गायत्रीभोवती रमते. त्यामुळेच त्याचे तिच्या घरातील काही क्षण मोहरून जातात. या कथेचा शेवट देखील काव्यमय झालेला आहे.

'पूटू' आणि 'साय' या कथेतील विश्वं परत निराळी आहेत. 'पूटू' मध्ये एका हौसेखातर नि कला म्हणून छायाचित्रण व्यवसायात शिरलेल्या माणसाला आलेला एक अनुभव चितारलेला आहे. या कथेतल्या गोकुळेबद्दल अपार दया वाचकाला वाटते. 'साय' या कथेत एक श्रीमंत पण उद्योगी पुरुषाच्या पत्नीच्या मनाचा संताप चितारला आहे.

'औदुंबर' नि 'श्रीमंताचा वस्तरा' या दोन्ही कथा एकाच साच्याच्या. औदुंबरातील 'व्ही. डी. नि दुसऱ्या कथेतील 'काका' दोघेही एका परीने कर्तृत्ववान. एकाचा रत्नाशी संबंध तर दुसऱ्याचा रखमाशी. दोघेही जीवनाचा खूप अनुभव घेऊन मोठे झालेले. दोघांच्या पौरुषावर या बायका भाळलेल्या. दोघांचेही म्हातारपण कठिण झालेले. व शेवटी खऱ्या लग्नाच्या बायकांपेक्षाही या त्यांच्यावर भाळलेल्या बायका अधिक प्रेमाने सेवा करताना चितारल्या आहेत.

**– प्रा. वि. द. संत**

(**औदुंबर** : कथासंग्रह. लेखक : श्री. श्री. दा. पानवलकर; मौज प्रकाशन गृह, मुंबई-४; मूल्य सहा रुपये)








## 'कुमारी माता' म्हणून राहण्याचा अट्टाहास

कु. सुमती वेलणकर यांची ही पहिलीच कादंबरी. पहिलीच कादंबरी असूनही निवेदन पद्धती रेखीव आहे. सुधा देशपांडे या श्रीमंत, सुस्वरूप, सुविद्य नायिकेप्रमाणेच नारायण-राव, ताई, सौ. आय्यंगार यांचे चरित्ररेखाटन उठावदार झाले आहे. नायिका सुधा एका आधुनिक मठात राहून त्याच्या भजनी लागते. त्या आश्रमाचे वर्णनही यथातथ्य आहे. मुखपृष्ठावरील चित्र-साजही लक्षात राहणारा आहे.

मलपृष्ठावरील निवेदनावरून ही समस्या मांडणारी कादंबरी आहे अशी कल्पना वाचकाची होते. कलावंत अनेकवेळा कलाकृतींतून सामाजिक समस्या मांडतो त्याचे उत्तर देण्याचा प्रयत्न त्याने करण्याची जरुरी नसते. या दृष्टीने या कादंबरीत काही समस्या मांडलेली दिसत नाही. कादंबरीचे स्वरूप एका स्त्रीचे अनुभवचित्र इतकेच मर्यादित आहे असे वाटते.

'नैसर्गिक भावनांचा कोंडमारा झाल्यामुळे स्त्रीच्या जीवनात निर्माण झालेले वैफल्य' या कादंबरीत रेखाटले आहे असे मलपृष्ठावरील निवेदनांत आहे. पण या कादंबरीतील 'नैसर्गिक भावनांचा कोंडमारा' मात्र नैसर्गिक वाटत नाही. दारिद्र्य, कुरुपता, किंवा अशाच तऱ्हेच्या अन्य काही कारणांनी हा कोंडमारा झाला असता तर ठीक होते, पण या कादंबरीतील नायिका सुधा हिला यातील कोणतेच कारण नाही. केव्हांही लग्न होऊ शकेल इतकी संपत्ती, स्वरूप व शिक्षण तिला मिळाले आहे. ती लग्न केवळ स्वेच्छेनेच करीत नाही. आपण शरीरसुखासाठी भुकेलेलो आहोत हे समज यावरही ती लग्न करीत नाही. त्याक्षणीही लग्न जमेल अशी परिस्थिती असते. या तिच्या वागण्यात स्वभावाची किंवा परिस्थितीची व दुर्दैवाची अपरिहार्यता साकार झालेली नाही. शरीरसुखाला भुकेलेली झाल्याने संयम सुटला असे म्हणावे तर तसा विवेकही ती आश्रमातील बुवांच्या लंपटपणाच्या वेळी दाखविते. अट्टाहासाने ती 'कुमारी माता' झाली तर ध्येयनिष्ठा दिसली असती पण तसंही घडत नाही. लग्नरुढीच्या विरुद्धही ती नाही. धीटपणाने कुमारी अवस्थेतच मातृत्व स्वीकारल्याने कुमारीमाताना समाज-मान्यता मिळेल असेही नाही. सामाजिक समस्या मांडून समाजाच्या वैचारिक जीवनात 'वावटळ' निर्माण करण्याचे सामर्थ्य या कादंबरीत जाणवत नाही.

—प्रा. वि. द. संत

[**वावटळ**: लेखिका—कु. सुमती वेलणकर **प्रकाशक**—भारतीय ग्रंथ भवन, दादर, मुंबई—१४, मूल्य सहा रुपये]

## विद्यार्थी जीवनाचे दर्शन

'वाटचाल' ही अनंत मनोहर यांची कादंबरी. मॅजेस्टिक कादंबरी स्पर्धेतून प्रसिद्ध झालेल्या कादंबरीतील एक कादंबरी.

या कादंबरीचा नायक सदानंद कुर्तकोटी या विद्यार्थ्याच्या दोन वर्षाच्या अभ्यासक्रमाच्या वाटचालीचे चित्र आहे. यामुळे या दोन वर्षाचे दोन विभाग पडतात. पहिला भाग अत्यंत संथ आहे. त्यामुळे थोडाफार कंटाळवाणा – नीरस झाला आहे. वराचसा भाग पार्श्वभूमीसाठी खर्च झाला आहे. कथानक मंदपणे पुढे सरकते. त्यामानाने दुसरा भाग कमालीचा गतिमान व म्हणूनच वाचकाच्या मनाची पकड घेणारा आहे. दुसऱ्या भागात संघर्ष प्रकर्षाने आलेले आहेत. डॉ. गर्गे यांची प्रा. शेंडवाळकर निंदा करतात. या निंदेने चिडलेला सदानंद व यामुळे सदानंद विरुद्ध प्रा. शेंडवाळकर असा संघर्ष, प्रा. शेंडवाळकरांनी सदानंद विरुद्ध केलेले प्रयत्न, या अडचणींशी व दुर्दैवाशी सदानंदाचा चाललेला संघर्ष, तितिक्षा, श्रुतिका व सदानंद असा – निराळा असा – प्रेमाचा त्रिकोण इत्यादि घटनांमुळे कादंबरी चित्तवेधक बनते. याच विभागात नटवर्यांसारखे विद्यार्थीही आपली चुणूक दाखवितात. कॉलेज विश्वातील घडामोडी, इष्ट व अनिष्ट प्रकृती, विद्यापीठातील वेंजवाबदार व केवळ परीक्षेपुरताच अभ्यास करणारे विद्यार्थी या सर्वांचे दोषदर्शनही याच विभागात झाले आहेत.

निवेदनाचा भर संवादावर असून अनेक गोष्टी वाचकाच्या कल्पना - शक्तीवर सोपविल्या आहेत. यामुळे पाल्हाळाचा भाग वराच टळला आहे. निवेदनातून सूचकतेने व्यक्तीचित्रणही साधते. याच संवादातून डॉ. गर्गे, डॉ. प्रधान, प्रा. शेंडवाळकर, मुनी यांची स्वभावचित्रे उठावपणे साकार झाली आहेत.

मुखपृष्ठावरील चित्र मुंबई विद्यापीठाची पार्श्वभूमी दाखविणारे आहे पण कादंबरीतील वातावरण मुंबई विद्यापीठातील नसावे. विद्यार्थी-शिक्षकांचे दोष सर्व विद्यापीठात सारखेच आहेत पण अभ्यासक्रम व पद्धति मात्र मुंबई विद्यापीठाशी सुसंगत नाही.

—प्रा. वि. द. संत

[**वाटचाल** : लेखक : अनंत मनोहर; प्रकाशक : मॅजेस्टिक बुक डेपो, मुंबई ४ किंमत ४ रुपये]





## जीवनातील कडू-गोड आठवणी

ढोले काकांच्या सैनिकाची बखर या पुस्तकातील त्यांच्या त्यांना आठविणाऱ्या काही ठळक आठवणी आपल्याला आठवण करून देतात त्या गोडसे भटजींच्या "माझा प्रवास" या पुस्तकाची! भटजींच्या आठवणी प्रवासातील आहेत, तर ढोले काकांच्या आठवणी त्यांच्या झंझावती आयुष्यातील आहेत. त्यांच्या या पुस्तकाचे अमर्याद यश त्यांच्या निरक्षरपणात आहे. ढोले काका लेखक नाहीत, वाङमयाचा त्यांचा अभ्यास नाही. त्यांनी कधी काही लिहिलं नाही. रुप हे पुस्तक हेच त्यांचे पहिले आणि शेवटचे पुस्तक. तेही वयाच्या साठाव्या वर्षी लिहिलेले! शेवटचे पुस्तक अशासाठी की, दुर्दैवाने ढोले काका आज हयात नाहीत. जसं घडलं तसं लिहिणं, हे अत्यंत कठीण, पण या प्रयोगात ढोले काका बरेच यशस्वी झाले आहेत.

नैसर्गिक आपत्तीने "दिवाळखोरीत" आलेल्या कुटुंबात आपला जन्म झाला अशीच पुस्तकाची सुरुवात आहे. "दिवाळखोरीत" या शब्दामागे स्पष्टवक्तेपणा आहे आणि हाच स्पष्टवक्तेपणा जागोजाग आढळतो. पत्नीच्या मृत्यूची बातमी ऐकताच ढोले काका "दोरी तुटलेल्या पतंगाप्रमाणे पुढील आयुष्यासाठी मी मोकळा झालो" असं म्हणून आपली व्यथा व्यक्त करतात आणि लगेच "पत्नी वारल्याचे पत्र आले तेव्हा मला यत्किंचितही दुःख झाले नाही, तर एका कटकटीतून आपण मुक्त झालो, असे मला वाटले. कारण ती जिवंत असताना सुखाऐवजी कटकटच झाली होती. त्यातून मी आता मोकळा झालो होतो." अशी आपल्या व्यथेवर स्वतःच मलमपट्टी करतात.

ढोले काका मूळचे खरे कंपॉझिटर. परंतु सेनापती बापटांच्या काव्याने भारावून जाऊन त्यांनी मीठ सत्याग्रहात उडी घेतली आणि पुढे सबंध आयुष्य त्यांनी राजकारण, ट्रेड युनियन आणि कम्युनिस्ट पार्टी, यांच्या सेवेसाठीच वेचले. लाठीमार, सत्याग्रह, मोर्चे, सभा, जेलच्या वाऱ्या, हे त्यांचे दैनंदिन जीवन. हे जीवन जगताना होणाऱ्या उपासमारीची पण त्यांनी पर्वा केली नाही. या त्यांच्या झंझावती जीवनातील आठवणी जशा वेधक, रंजक आहेत तशाच बराच विचार करायला लावणाऱ्या आणि काही तरी शिकविणाऱ्या आहेत. त्यांच्या काही आठवणी खुदकन हसू आणतात, तर काही आठवणी क्षणभर वाचकाला गुंग करून टाकतात. उदा : "दोन वर्षांच्या भूमिगत कार्यात मी फक्त दोनदाच घराबाहेर पडलो. या काळात पस्तीस रुपये पगार मिळायचा, पण जेवणाचे पैसे जाऊन हातात पाच रुपयेच रहायचे." किंवा प्रेसवर पोलिसांचा छापा पडताच लेखक स्वतः दोषी नसतानाही आपल्या इतर कार्यकर्त्यांना वाचविण्यासाठी स्वतः तुरुंगवास पत्करतो, यावेळी ढोले काका म्हणतात, हुँडविलास (सरकारविरोधी) सर्वस्वी मीच जबाबदार आहे असे सांगून कॉ. आठरे यांना वाचविले आणि अडीच महिने हवा पालटासाठी विसापूर जेलचा रस्ता सुधारला!"

सत्याग्रहात भाग घेण्याची चुलत्याने परवानगी द्यावी म्हणून ढोले काका आपल्या चुलत्यांना पत्र पाठवितात. "मी सत्याग्रहात भाग घेत आहे, आपला आशीर्वाद-परवानगी असावी. न पेक्षा राजकीय सत्याग्रहा अगोदर आपल्यापुढे घरात सत्याग्रह करावा लागेल." लेखकाचा स्वभाव जसा जिद्दी, हट्टी दिसतो त्यापेक्षा विलक्षण हळवा आणि भावनाप्रधान आढळतो. दोन पैसे कुणाचे ठेवायचे नाहीत, ही वृत्ती लेखकाच्या अंगी भिनली आहे. "मोहन मुद्राचे" ३५० रुपये कर्ज झाले. कर्ज फेडणं कठीण होतं, पण पैसे बुडवायचे नाहीत म्हणून ढोले काकांनी त्याच प्रेसमध्ये काम करून पैसे फेडले. हा प्रसंग आणि पहिल्याच रेसमध्ये मी हरलो, म्हणून मी रेसबाज झालो नाही, हा प्रसंग विलक्षण गमतीदार आहे.

सरते शेवटी ढोले काका म्हणतात, "माझ्या आयुष्यात मी सरकार – मांडवलदारांविरुद्ध जितका झगडलो, त्याच्या चौपट लहानपणापासून मी रोगांशीच झगडत आलो आहे. आजारी असणे हा माझा स्थायीभाव आहे. चांगले असणे चुकून माकून! सायकलची ट्यूब झिजली म्हणजे तिला एक भोक पडते. त्याला पॅच बसवला की दुसरे. ते सांधले म्हणजे तिसरीकडे फुटावे, तशी माझ्या शरीराची अवस्था झाली आहे" आणि हीच त्यांची अवस्था त्यांचे हे पहिलेच पुस्तक प्रसिद्ध होण्यापूर्वी पूर्णत्वाला पोहचली, हे आपले दुर्भाग्य!

**— श्रीकांत सिनकर**

[**सैनिकाची बखर**:—लेखक : द. कृ. ढोले, अभिनव प्रकाशन, पृष्ठे १०२, मूल्य ६ रु.]



अनुक्रमणिका








भारतीय स्वातंत्र्ययुद्धाचा अर्थात् 'पारतंत्र्यप्राप्तीपासून' स्वातंत्र्यप्राप्तीपर्यंतचा

# संक्षिप्त-इतिहास: नव्या दृष्टिकोनातून

## मुलांसाठी (प्रौढ) खास



जगतशेठ - अमीचंद...!
देशघातकी भांडवलदार

प्रकरण पहिले

### पारतंत्र्यप्राप्ती

१७५७ साली जगत्‌शेठ आणि अमीचंद या दोन व्यापाऱ्यांनी इंग्रजांच्या मदतीने बंगालचा नबाब सिराजउद्दौला याचा सेनापती मीर जाफर यास फितूर करून घेतले. (सिराज-उद्दौला हा अल्पसंख्य जमातीचा असूनही आपल्या गुणांमुळे उच्चपदी पोचला होता. यावरून १७५७ साली देखील भारत धर्मनिरपेक्ष होता हे सिद्ध होते!) आणि मीर जाफरच्या मदतीने इंग्रजांनी प्लासीच्या लढाईत सिराजउद्दौलाचा पाडाव केला. मीर जाफर हा देशद्रोही जरी अल्पसंख्य जमातीचा होता तरीही तो अपवाद होता हे लक्षात ठेवले पाहिजे. अमीचंद आणि जगत्‌शेठ हे व्यापारी भांडवलदार होते; त्यांचे उदाहरण भांडवलदार एकजात कसे निमकहराम आणि देशघातकी असतात ते दाखविण्यास पुरेसे आहे.

प्रकरण दुसरे

### पारतंत्र्यविकास

यानंतर अनेक मार्गांनी इंग्रजांनी आपले राज्य भारतात स्थिर केले; यातले काही मार्ग अमानुष वगैरे होते, असे काही इतिहासकार म्हणतात; परंतु माणूस हा जन्मतः चांगलाच असतो, परिस्थिती त्याला वाईट बनवते हे आपण विसरू नये! इंग्रजांना काही इतिहासकार वाईट म्हणत असले तरी तसे चांगलेच होते. भारतात त्यांनी कित्ती कित्ती सुधारणा केल्या, अजूनही आपल्याला ते मदत करतात. माणूस कितीही चांगला असला तरी त्याच्या हातून कधीकधी चुका होतातच. इंग्रजांनी आपले स्वातंत्र्य हिरावून घेऊन अशीच एक लहानशी चूक केली होती.



मीर जाफर : एक अपवाद



अनुक्रमणिका



झाशीची लक्ष्मी.
(घोडेफेकीतील जागतिक विक्रम)

प्रकरण तिसरे

## स्वातंत्र्यासाठी प्रयत्न

एकोणीसाव्या शतकात झांशी येथे लक्ष्मी नावाची एक धाडसी स्त्री होऊन गेली. तिला काही इतिहासकार कौतुकाने आणि आदराने 'राणी लक्ष्मीबाई' म्हणतात. तिने किल्ल्याच्या तटावरून उडी मारून घोडेफेकीचा जागतिक विक्रम केला होता. भारताच्या स्वातंत्र्यासाठी तिने काही प्रयत्न केले असावे अशी समजूत आहे. १८५७ साली काही लोकांनी इंग्रजांविरुद्ध बंड केले होते, त्यातही तिने भाग घेतल्याचे पुरावे उपलब्ध आहेत. या बंडाला काही Chauvinist (शॉविनिस्ट) इतिहासकार 'अठराशे सत्तावनचे स्वातंत्र्यसमर' या नावाने संबोधतात.



अतिरेकी युद्धखोर
वि दा सावरकर

वि. दा. सावरकर, सु. चं. बोस यांसारख्या काही अतिरेकी युद्धखोर लोकांनी स्वातंत्र्ययुद्धाचे श्रेय उपटण्याचा प्रयत्न केला, पण जागृत जनतेने त्यांना किंमत दिली नाही व त्यांचा प्रयत्न हाणून पाडला. आपल्या सर्वांच्या लाडक्या पंतप्रधान इंदिराजी यांचे पूज्य पिताजी जवाहरलाल नेहरू यांनी मात्र राष्ट्रपित्याला त्यांच्या कामात खूप खूप मदत केली.

प्रकरण चौथे

## राष्ट्रपिता

१८६९ साली २ ऑक्टोबर रोजी पोरबंदर येथे सौ. पुतळीबाई करमचंद गांधी यांच्या पोटी आपल्या राष्ट्रपित्याने जन्म घेतला. त्यांचे नाव मोहनदास असे ठेवण्यात आले. पूज्य बापूजींचा जन्म झाल्याची बातमी कळताच इंग्रजांचा




थरकाप झाला. नंतर १८८९ साली काँग्रेसची स्थापना झाली आणि भारताच्या स्वातंत्र्ययुद्धाचे महान पर्व सुरू झाले. 'या काँग्रेसची तरफदारी करणाऱ्या मुसलमानांना राष्ट्रीय मुसलमान म्हणण्यात येऊ लागले' (पहा : पान ८९ – 'भारत इतिहास दर्शन–' भाग तिसरा प्रकाशक : व्हीनस प्रकाशन पुणे) मोठेपणी बापूजींनी सत्याग्रह, असहकार वगैरे अहिंसक मार्ग वापरून इंग्रजांचे हृदयपरिवर्तन केले.

अशा तऱ्हेने पूज्य बापूजींनी आपल्या भारताला रक्ताचा एकही थेंब न सांडता स्वातंत्र्य मिळवून दिले आणि १९ ऑगस्ट १९४७ रोजी लाल किल्ल्यावर तिरंगी झेंडा फडकला. तेव्हापासून १९ ऑगस्टला सुटी असते.

: संकलन आणि चित्रे :
**अशोक डोंगरे**








अनुक्रमणिका

[पृष्ठ १८ वरून–**आचार्य अत्रे**]

जगाच्या मानगडी काकदृष्टीने बघण्याची, मधुमक्षिकेप्रमाणे गोळा करण्याची व सुगृहिणीप्रमाणे त्याला तिखटमीठ लावून व आपल्या कल्पनेची फोडणी देऊन त्या लोकांना ऐकवण्याची अत्र्यांना मोठी हौस होती. अत्र्यांच्या इतका मानगडींचा मोक्ता मिळणे कठीण! यामधूनच अॅटम बॉंब, हैड्रोजन बॉंब यांची जाहिरात होई. पुढील अंकात अमुक तमुक मंत्र्याचे, लेखकाचे किंवा पुढाऱ्याचे महाभयंकर रहस्य देणार अशी मोठ्या चौकटीमधून घोषणा करण्यात येई. कधी कधी प्रचंड स्फोट होई. 'नानू नीछा प्रकरण' हे याचे उत्तम उदाहरण होय. पण काही वेळ गर्जेल तो पडेल काय असा प्रकार होई. अत्र्यांचा येणेप्रमाणे मूकनायक झाला की त्यांचे काही हितशत्रू, अत्रे धाकदपटशा दाखवतात आणि कोंडीत पकडलेल्या माणसाकडून पैसे उकळतात, असा आरोप करीत आणि काही महाभाग तर अशा अर्थव्यवहाराच्या वेळी आपण प्रत्यक्ष हजर होतो, आपण म्हणतो ते अक्षरशः चक्षुर्वैसत्यं आहे असे जोरात सांगत. अत्र्यांना उघड उघड याबद्दल विचारण्याची सोय नव्हती. पण एकदा कशावरून तरी विषय निघाला तेव्हा अत्रे म्हणाले, "मानगडी खऱ्या असतात, पुरावा भरभक्कम असतो पण जाहीर केले रे केले की गुंतलेली माणसे पाया पडतात, वजनदार माणसांची भीड घालतात"—आणि त्यामुळे साष्टांग नमस्कारातील रावबहादुराप्रमाणे जो कोण साष्टांग नमस्कार घालील त्याला अत्र्यांच्याकडून अभय मिळे! खरी गोष्ट काय ती ज्याच्याविरुद्ध अॅटम बॉंब उडणार होता त्याला, खुद्द अत्र्यांना आणि परमेश्वरालाच ठाऊक. अत्र्यांच्या सहवासात मी अनेक वर्षे होतो, बदनामी करणारी अशी पुराव्याची काही पत्रे कधी कधी अत्र्यांनी दाखवली ती बघितली. पण यापलीकडे काय घडत होते ते कळण्याइतका मी अत्र्यांचा निकटवर्ती अर्थातच नव्हतो. आपल्याला गुह्यात गुह्य गोष्ट माहिती आहे असा पोकळ डौल आणण्याचे श्रेष्ठ धारिष्ट्य माझ्यात नाही. अत्र्यांच्याकडे नावनिशीवार आणि कागदपत्रांच्या पुराव्यासकट महाराष्ट्रातील अनेक मातबर व्यक्तींच्या विविध मानगडींचा संग्रह होता हे मात्र निर्विवाद. अत्र्यांच्या मृत्युपत्रापेक्षा या मानगडींच्या मांडाराचे काय झाले याचे कुतूहल मला अधिक आहे.

पैसा जसा पैशाकडे जातो, त्याप्रमाणे मानगडीही मानगडीकडे जात असतात. अत्रे नेहेमी म्हणत, मी मानगडी शोधीत हिंडत नाही, मानगडीच माझ्याकडे चालत येतात. 'मराठा'च्या एका अंकात अत्र्यांनी "एक आय. सी. एस. अधिकाऱ्याचे महाभयंकर रहस्य रविवारच्या अंकात वाचा" असे प्रसिद्ध केले. दोन-तीन दिवसांनी मी अत्र्यांना भेटलो. संपादक महाशय हसत म्हणाले, दोन "दिवसात पाच आय. सी. एस. अधिकारी मला भेटून गेले. प्रत्येक जण गयावया करून एकच गोष्ट मला सांगत होता, 'आमची ती मानगड कृपा करून छापू नका.' काही न करता पहिली एक आणि ह्या पाच अशा सहा मानगडी जमा झाल्या." अत्रे गेले आणि त्यांच्याबरोबर ही 'निषिद्ध बहुश्रुतताही' लोपली.

## अनुभवांचा 'कथासरित्सागर'

अत्र्यांच्याकडे अगदी निग्रह करून दोन मिनिटांकरिता जावे पण दोन तीन तास त्यांच्या वाक्‌गंगेच्या प्रवाहाच्या भोवऱ्यात गरागरा फिरत रहावे असे होई. संभाषणाला काळाचे, कायद्याचे किंवा औचित्याचे बंधन नसल्यामुळे अत्र्यांच्या भाषणापेक्षा, नाटकापेक्षा किंवा लेखापेक्षा संभाषणात वेगळाच रंग भरे. भाषण करताना किंवा लेखन करताना त्यात जो औपचारिकपणाचा, जाणीवपूर्वक केलेल्या प्रयत्नाचा अंश असतो त्याचा मागमूसही गप्पात नसतो. भाषण आणि लेखन म्हणजे एक प्रकारचे गावभोजन. उलट चार-पाच निवडक लोकांना आवर्जून बोलवावे व ताजा पदार्थ करून पानात वाढावा असा घरगुती आणि अनौपचारिक प्रकार म्हणजे संभाषण अत्र्यांच्या हातचे किंवा तोंडचे म्हणा गोड, तिखट आणि खमंग पदार्थ मी जवळजवळ तीन तपे आकंठ ग्रहण केले आहेत. अत्र्यांचे अवलोकन जेवढे सूक्ष्म व अचूक तितकीच त्यांची स्मरणशक्ती प्रखर. अत्र्यांनीच म्हटल्याप्रमाणे मांजराप्रमाणे प्रत्येक मांड्यात डोकावण्याची जबरदस्त खोड. यामुळे अनेक क्षेत्रातील अनुभवांचे अमर्याद मांडवल. वेळोवेळी अत्र्यांनी सांगितलेल्या गोष्टी एकत्र केल्या तर एक 'कथासरित्सागर'च तयार होईल. 'कऱ्हेच्या पाण्याचा' असा एक कथात्मक किंवा व्यक्तिचित्रणात्मक खंड काढण्याचा अत्र्यांचा विचार होता. पण प्रत्येक आठवणीचा लघुत्तम साधारण विभाज्य मानगड व त्यामुळे होणारी बदनामी हा राहणार असल्यामुळे अत्रे हा आपला संकल्प तूर्त तहकूब करीत. एखादी गोष्ट मासला म्हणून रंगवून सांगत व हसून म्हणत, "ही गोष्ट छापणे शक्य आहे का?" अशी एक दिवस एका रविकिरण कवीची अत्र्यांनी गोष्ट सांगितली. "रात्री दहा साडेदहाचा सुमार होता, झोपलो होतो. कविराज घाईघाईने आले, दार ठोठावले, मी दार उघडले. कविराज कळवळून म्हणाले, "रात्रीच्या पॅसेंजरने एम्. ए. साठी मुंबईस जातो आहे. फॉर्म भरला आहे. परीक्षा उद्या ११ वाजता सुरू आहे पण मुंबई-पर्यंतच्या प्रवासाला व वरखर्चाला पैसे नाहीत. दहा रुपये कसेही करून द्या. ताबडतोब परत करीन." आम्ही शतदरिद्री. वाड्याच्या मालकाला उठविले, १० रुपये उसनवार घेतले आणि कविबुवांना दिले. त्याला अडतीस वर्षे झाली. कवीच्या काव्यात अर्थ नसला तरी आता अर्थसंचय भरपूर आहे. पण १० रु. अजून मिळाले नाहीत. पवित्र कार्यात खर्ची पडले हे समाधान." अत्र्यांची ही गोष्ट फारच निरुपद्रवी व बालबोध आहे पण अत्र्यांच्याकडे अनेक नागमोडी गोष्टींचा संग्रह होता. अनेक सिंहगडांचे द्रोणागिरी कडे त्यांना ठाऊक होते. त्यात अतिशयोक्ती असेल पण पु. ल. देशपांडे यांच्या हरितात्याप्रमाणे अत्रे पुराव्याशिवाय बोलत नसत. पण त्याचबरोबर या गोष्टीवेल्हाळ माणसाकडे 'परिहास विजल्पितही' अक्षरशः हजारो पाने भरतील इतके होते.

(क्रमशः)






[पान २६ वरून—सुप्रिया]

एका मिल्कबारमध्ये मी राजेशची मुमताजशी ओळख करून दिली. राजेशने नेहमीच्या पद्धतीने तिला आपल्या मालकाच्या श्रीमंतीने दिपवून टाकण्याचा प्रयत्न केला. पण मुमताज शांत बसली होती. एक अक्षरही तोंडातून तिने बाहेर काढले नाही. शेवटी मात्र ती म्हणाली, "नशिबवान आहेस तू. तुला सुप्रिया मिळाली."

'कां?' राजेशने चमकून विचारले.

"कारण शोफरना मोलकरणी मिळतात."

राजेश मनातून दुखावला होता. पण त्याने तसं दाखवलं नाही. "खरं आहे तुझं म्हणणं. माझ्या अगोदरच्या शोफरने एका मोलकरणीशीच लग्न केलं. पण माझ्या बाबतीत असं कां घडलं मला कळत नाही. सुप्रिया मोलकरीण असती तर बरं झालं असतं. मला त्याचं मुळीच वाईट वाटलं नसतं." तो हात हलवत म्हणाला. "पण खरं सांगायचं म्हणजे परक्या पुरुषासमोर नग्न उभं राहणं मला मुळीच आवडत नाही. पण त्या बंद्यात असल्याने तिला आपल्या मित्रासमोर ———" त्यानं मान हलवली आणि सिगरेटचं पाकीट पुढं केलं.

मुमताजला काय उत्तर द्यावे हे सुचलं नाही. तिने सिगरेट ओढायला नकार दिला. आणि घड्याळात पाहत म्हटलं, "सुप्रिया आपल्याला आता गेलच पाहिजे." आम्ही राजेशला तिथंच सोडून निघालो. रस्त्यावरून चालताना मुमताज म्हणाली, "तू वेड्यासारखं करतेस. अशा माणसाशी मी केव्हाच लग्न करणार नाही."

"तुला तो आवडला नाही?"

"मुळीच नाही. तू मला म्हणाली होतीस तो उंच आहे. पण तो तुझ्याहूनही ठेंगणा आहे. त्याची बोलण्याची आणि वागण्याची पद्धत फार संशयी आहे. अन् शोफर असून एवढा रुबाब!"

"पण माझं त्याच्यावर प्रेम आहे."

"पण तो तुझ्यावर प्रेम करीत नाही त्याचं काय? एक दिवस तो तुला सोडून जाईल." ती शांतपणे म्हणाली.

थोड्याच वेळात मुमताजने त्याची चांगली पारख केली होती. मुमताजबद्दल राजेशचं मतही चांगलं निघालं नाही.

"तुझी ती मैत्रिण! रांड आहे. रस्त्यावर फिरणारी. कुणीही बोलवावी. पण इतके चांगले कपडे कुठून आणते?"

"तिचा प्रियकर तिला देतो."

"प्रत्येक रात्री नवा प्रियकर. आता एक ती किंवा मी. कुणीतरी एक मिळेल तुला."

"म्हणजे?"

"तुला जर तिच्याशी मैत्री ठेवायची असली तर माझा संबंध तुटला. ती किंवा मी." त्याच्या बोलण्यात करडेपणा होता. राजेशशी होणारं लग्न, संसार हे स्वप्न धुळीला मिळू नये म्हणून मुमताजशी मैत्री न ठेवण्याचं मी त्याला वचन दिलं. पण हे वचन पाळणं मला शक्य नव्हतं. तिची दोस्ती तोडणं मला शक्य नव्हतं. राजेशला कळू नये अशा रीतीने मी तिला भेटत होते.

मुमताज माझ्या घाणेरड्या कपड्याविषयी नेहमी बोले. आणि त्यामुळे मला फार वाईट वाटे. एक दिवस फिरोजने एक हॅण्डबॅग मला प्रझेंट देण्याची गोष्ट केली.

"फिरोज तिला तू प्रेझेंट वगैरे काही द्यायचं नाही. तिचा प्रियकर हवा तर देईल." मला प्रेझेंट देण्यामागे फिरोजचा चांगला हेतु होता; पण त्यामुळे मुमताजला माझा अपमान करायचा चान्स मिळाला. त्याच दिवशी मी हॅण्डबॅग खरेदी केली. दुसऱ्या दिवशी मी दोघांना भेटले. हॅण्डबॅग दाखवून राजेशने दिल्याचे सांगितले.

"तुला काही मला सल्ला द्यायचा आहे." मुमताज एक दिवस मला म्हणाली.

"दे ना." मी म्हणाले.

"तू माझ्या वहिणीप्रमाणे आहेस. मला तू फार आवडतेस. तुला हवं ते मिळवून देण्याची किमया या सौंदर्यात आहे. आणि असं असून तू कहीच फायदा उठवत नाहीस. तू घाणेरड्या कपड्यात फिरलेली मला बिलकूल खपत नाही." ती थोडा वेळ थांबली. निर्विकार चेहऱ्याने तिने माझ्याकडे पाहिलं. "एक दिलदार स्वभावाचा उमदा पुरुष आहे. पोलिस खात्यात मोठ्या जागेवर आहे. विधुर आहे." ती हळू आवाजात म्हणाली, "त्याच्याशी मी तुझी ओळख करून देते. त्याला तू आठवड्यातून एकदा भेटलीस तरी चालेल. कुणाला काहीच कळणार नाही. अन् तू राजेशशी लग्न करायला त्याची मुळीच हरकत नाही. तू चांगली सुखात राहशील याची तो काळजी घेईल."

"आभारी आहे मी तुझी अन् त्याची." मी तावडतोब म्हणाले. "पण मला ते शक्य नाही. राजेशवर प्रेम करते आणि त्याच्याशी प्रतारणा करणे कसं शक्य आहे? त्याला समजलं तर?"

"पण राजेशला त्याबद्दल काहीच समजणार नाही."

"तरी पण ते शक्य नाही."








विचार कर. ती हळूच आपल्याशी पुटपुटत म्हणाली.

"कुणी मला गळ घातली आणि त्याला मी वचन दिलं तर मी काय करूं सांग ?"

"त्याला सांग मला हे शक्य नाही. दुसरी कोणीतरी बघ."

तिने माझी विनवणी केली. अनेक गोष्टी सांगितल्या पण मी काही बधले नाही.

"मूर्ख आहेस तू. तुला देव देतोय पण तुला घ्यायची अक्कल नाही." ती वैतागून म्हणाली.

मी कसलाही विचार न करताच नकार दिला होता. पण विचार केल्यावर मुमताज सांगत होती तेच बरोबर आहे असं वाटू लागलं. कदाचित् मला हव्या असलेल्या साऱ्या गोष्टी मिळ-वण्याचा तोच एक मार्ग होय. पण मग मी तो विचार मनातून काढूनच टाकला.

घरी गेल्यावर मला राहवलं नाही. मी सारं आईला सांगितलं. ते ऐकताच आईचा चेहरा आनंदानं फुलून निघाला.

"कोण आहे तो ?"

"एक सभ्य गृहस्थ." तो पोलिसातला आहे हे सांगायला मला लाज वाटली.

"तो श्रीमंत आहे असं ती म्हणाली."

"हो. तो चांगला मिळवता आहे."

"तू त्याच्याशी ओळख कां करून घेतली नाहीस ?"

"पण मला त्याची गरज नसल्याने प्रश्नच नव्हता."

"तो श्रीमंत आहे. त्याला तू आवडलीस. त्याला तुझी गरज आहे. तेव्हा त्यानं तुला कोणत्याही मोबदल्याची अपेक्षा न करता त्याने तुला मदत केली असावी."

"असं कसं सांगतेस आई. आणि उगाच का त्याने मला आठ-वड्यातून दोन वेळा भेटायला बोलावले ?"

"काही बिघडलं नाही. मुमताजला सांगून तू त्याला भेट." मी नकार दिल्यावर मुमताज त्या माणसाविषयी बोलली नाही. राजेशला मुमताज आवडत नसल्याचं जेव्हा मी सांगितलं तेव्हा ती म्हणाली, "तिचा प्रियकर तिला देत असलेल्या कपड्याशी तू तुलना करशील म्हणून तो घाबरतो."

"म्हणून काहीच नाही हं आई, त्याच्या मते ती वाईट चालीची आहे."

"तोच वाईट आहे. मुमताजला तू भेटतेस हे कारण सांगून त्याला लग्न मोडायचं आहे."

मी घाबरून गेले. "पण आई मी मुमताजला भेटते हे मात्र तू त्याला सांगू नकोस.

"मला त्याच्याशी काहीच कर्तव्य नाही."

"जर का तू त्याला सांगितलंस तर मी तुला मेले म्हणूनच समज."

* *

## [ ५ ]

एक दिवस मुमताजने मला पिकनिसाठी येण्याची विनंती केली. मला थोडा विरंगुळा हवा होताच. मी तावडतोब होकार दिला. मुमताज, फिरोज आणि त्याचा दोस्त असे तिघे जाणार होते. बरोबर चौथं कोणी असावं म्हणून मला बोलावलं आणि मी होकार दिला. स्टुडिओत खूप काम आहे दोनतीन दिवस भेटणार नाही अशी मी राजेशला अगोदरच थाप मारली होती. सकाळीच नाना चौकात ठरलेल्या जागी फिरोजची मोटर आली. मला जवळ येताना पाहून फिरोजचा दोस्त धावतच पुढे आला. तो मध्यम उंचीचा, फिकट चेहऱ्याचा, डोक्यवरचे केस जरा विरळ झालेला असा होता. त्याची नजर मात्र तिखट होती. त्याचे कपडेही रुबाबदार होते. मुमताजने मला त्याची ओळख करून दिली. त्याचं नाव राम म्हात्रे. ज्याच्या-विषयी मुमताज बोलली होती तोच हा माणूस असा मला दाट संशय आला. मी त्याला नमस्कार केला. तो माझ्या शेजारीच मागल्या सीटवर बसला आणि गाडी चालू झाली.

गाडी जशी जोरात जाऊ लागली तसा थंड हवेच्या स्पर्शाने माझा चेहरा फुलून निघाला. माझं मन उल्हसित झालं. गाडीतून बाहेर फिरायला जाण्याची माझ्या आयुष्यात ही दुसरी किंवा तिसरी वेळ होती. सृष्टीसौंदर्याने मला वेडावले होते. पण राम म्हात्रे माझ्या सौंदर्याने वेडा झाला होता. तो सारखा माझ्याकडे डोळे भरून पहात होता. त्याच्या बोटांचा स्पर्शही मला होत होता. मला मात्र उगीच शरमल्यासारखं झालं. शेवटी मी त्याच्यावरोवर बोलायला सुरुवात केली.

"किती छान अंगठी आहे !" त्याच्या बोटातल्या अंगठीकडे पहात मी म्हणाले.

त्यानं आपली नजर खाली वळवली. "माझ्या वडिलांची आहे. त्यांच्या मृत्यूनंतर मीच वापरतो."

"तुमचं लग्न. . ." मी माझं वाक्य पुरं करायच्या आधीच तो म्हणाला. "माझं लग्न झालंय. बायको आहे. दोन मुलं पण आहेत."

"मला वाटलं होतं तुम्ही विधुर आहात." मी म्हणाले.

"तसं पहायला गेलं तर मी विधुर आहे. माझी बायको माझ्या-बरोबर रहात नाही."

"का ती सुंदर नाही ?"

"तुझ्याइतकी मुळीच नाही." त्याने माझा हात पकडण्याचा प्रयत्न केला. मी बाजूला सरकले.

"तू बायकोबरोबर कां राहात नाही ?"

"मला ती आवडत नाही. मी लहान असतानाच माझं लग्न झालं. माझ्या आईने ठरवलं होतं. तुला माहीतच आहे लग्न कशी ठरवली जातात. एका चांगल्या घरची मुलगी आणि भरपूर हुंडा, आई बाप सर्व काही रवतात. आणि मग मुलानं लग्न करायचं

अनुक्रमणिका

असतं. याला लग्न म्हणायचं! अशा तऱ्हेने आणलेल्या बायकोशी संसार कसा करायचा ? त्याने पर्समधून फोटो काढला आणि माझ्या हातात दिला. फोटोत दोन रोड मुलं आणि त्याच्या खांद्यावर हात ठेऊन क्षय-रोग्यासारखी दिसणारी बाई उभी होती. मी तो फोटो त्याला परत दिला.

"तुझ्या संगतीत रहावं अशी माझी इच्छा आहे."

"अजून तुमची मला पुरी ओळखसुद्धा झाली नाही." त्याच्या तऱ्हेवाईक वागणुकीने मी गोंधळून गेले.

"तुझ्याविषयी मला पूर्ण माहिती आहे. गेला महिनाभर मी तुझा पाठलाग करतोय."

तो माझ्यापासून थोडा दूर बसला होता. तो माझ्याशी आदरानं बोलत होता. त्याच्या बोलण्यातून त्याचे आंतरिक विचार बाहेर पडत होते.

"माझं लग्न ठरलंय." मी म्हणाले.

"मुमताज तसं मला म्हणाली खरं, पण तुझ्या त्या होणाऱ्या नवऱ्याविषयी काळजी नको. त्यामुळे असा कोणता फरक पडणार आहे ?" त्याने आपला चेहरा वेडावाकडा केला.

"खूपच फरक पडणार आहे."

त्यानं माझ्याकडे पाहिलं. "मला तू खूप आवडतेस."

"मला माहीत आहे."

"मला तू अतिशय आवडतेस." तो परत म्हणाला, "तुला त्याची कल्पना सुद्धा नसेल."

त्याची मनस्थिती काही ठीक नव्हती. तो माझ्यापासून दूर बसला होता. त्यानं माझा हात हातात घ्यायचा प्रयत्न केला नाही.

"नुसत्या आवडण्याने काही होत नाही." मी म्हणाले.

"मी श्रीमंत आहे. तुला सुखी राखण्याइतपत माझी ऐपत आहे. तू माझ्याशी कायमचा संबंध ठेवलास तर तुला पश्चात्ताप करायची पाळी येणार नाही."

"तुझ्या पैशाची मला आवश्यकता वाटत नाही." मी निर्विकार चेहऱ्याने, शांत चित्ताने म्हणाले. त्याने ते ऐकल्यासारखं दिसलं नाही.

"तू खूप सुंदर दिसतेस."

"आभारी आहे."

"तुझे डोळे छान आहेत."

"खरंच तुला असं वाटतंय ?"

"होय. तुझे ओठ पण छान आहेत. मला चुंबावेत असं वाटू लागलंय."

"असं तू माझ्याशी कां बरं बोलतोयस् ?"

"मला तुझ्या प्रत्येक अवयवाचं चुंबन घ्यावसं वाटतंय."

"तू मला हे पुन्हा पुन्हा ऐकवू नकोस. हे काही चांगलं नाही. माझं लग्न ठरलंय आणि येत्या दोन महिन्यात मी विवाह करणार आहे."

"माफ कर, पण हे सारं सांगताना मला खूप आनंद होतोय."

"लोणावळा इथून किती दूर आहे ?" विषय वदलण्यासाठी मी विचारलं.

"जवळ आलोच आपण. लोणावळ्याला आपण लंच घेऊ. तू माझ्याजवळ बसशील असं मला वचन दे."

मला हसू आलं. त्याच्या अंगात भूत संचारलं होतं आणि तो माझी खुशामत करत होता. मी म्हणाले, "बरं बसेन."

"आता बसली आहेस अशीच माझ्याकडे बघून रहा. तुझ्या शरीराचा वास मला पुरेसा आहे." तो म्हणाला.

"मी काही अत्तर लावलेलं नाही."

"मी तुला अत्तर प्रेझेंट देईन."

आता आम्ही लोणावळ्याला पोचलो होतो. इतका वेळपर्यंत फिरोज आणि मुमताज एक चकार शब्द बोलली नव्हती. रेल्वे क्रॉसिंगजवळ आमची गाडी थांबली; त्यावेळी मुमताज मागं वळून म्हणाली, "तुमचं कसं काय चाललंय ? जमतय ना दोघाचं ?"

राम काहीच बोलला नाही. "आम्ही दोघं नुसतं बोलत होतो. जमण्याचं त्यात काहीच नाही." मी म्हणाले.

"चूप बैस." मुमताजची ती वागणूक आणि फिरोजचा तो शांत-पणा मला अगदी त्यांचा संताप आला होता.

पण मी तुला—— मी सुरुवात केली.

"गप् बस आता. रागवायचं काही कारण नाही." मुमताज म्हणाली आम्ही तुझं राजेशशी लग्न होऊ देणार नाही." क्रॉसिंग उघडल्यावर आम्ही पुढे निघालो. राम मुळीच बोलत नव्हता. त्याचा चेहरा मलूल झाला होता. आम्ही एका रेस्टॉरंटमध्ये गेलो. तिथे काऊंटरपाशी उभ्या असलेल्या एका हिप्पी टाईप माणसाकडे राम रागवून पाहत होता. मी त्याला कारण विचारलं.

"तो तुझ्याकडे पाहून हसत होता."

"समजा त्याने माझ्याकडे पाहिलं तर काय वाईट झालं ?"

"त्याच्या थोबाडीत द्यायला जास्त वेळ लागणार नाही."

---

**हाय जंप ?**



'इंदिरा गांधी आणि जगजीवनराम यांच्याच काँग्रेसशी मी एकनिष्ठ आहे' -- बाळासाहेब देसाई

अनुक्रमणिका

"तू जर असं काही वागलास तर मी तुझ्याशी एक शब्दही बोलणार नाही." मी रागावले होते." मी अशी तुझी कोण लागते की तू माझ्यासाठी लढावं ?" तो काहीच बोलला नाही. त्याने पैसे दिले आणि तो बाहेर पडला.

आम्ही हळूहळू फिरत होतो. लोणावळ्यातल्या त्या छोट्या घरांकडे पाहून मी म्हणाले, "असलं घर मिळालं रहायला तर मला फार आवडेल."

"अगबाई ! ह्या अशा ठिकाणी कायमचं रहायचं ? मला कुणी सोन्यात मढवून काढली तरी राहणार नाही." मुमताज म्हणाली.

"मोठ्या शहरात रहायची सवय असलेल्या आम्हा लोकांना असल्या छोट्या गावात राहाणं मुष्कील आहे. तुलाही लवकरच कंटाळा येईल सुप्रिया." राम म्हणाला.

"माझ्या प्रियकराबरोबर मला इथं राहायला बरं वाटेल." मी राजेशबरोबर रहायची स्वप्नं रंगवीत होते. "तुला कसं काय वाटतं राम ?"

"मी तुझ्याबरोबर कुठेही रहायला तयार आहे." तो हळुवार आवाजात म्हणाला.

"सुप्रिया तुझं थोडक्यात समाधान होतं. तू जास्त इच्छा कधी करीतच नाहीस. त्यामुळे तुला काही मिळतच नाही." मुमताज म्हणाली.

"पण मला जास्त काही नकोच मुळी."

"तुला राजेशशी लग्न करायचंय ?" फिरोजने विचारले.

"होय." मी म्हणाले.

आम्ही एका हॉटेलात शिरलो. मुमताज आणि फिरोजच्या चांगलाच ओळखीचा दिसला हॉटेलवाला.

छोटीशी आणि नीटनेटकी डायनिंगरूम पाहून माझं मन नाचू लागलं. त्यामुळं ती अर्धवट उघडलेली बेडरूम, मुमताज आणि रामच्या डोळ्याचे संकेत ह्याकडे मी विशेष लक्ष दिलं नाही. जेवणासाठी मी रामच्या शेजारीच बसले होते; पण तो आपल्यातच मग्न दिसला. मला भूक लागल्याने मी खाण्यावर तुटून पडले. मुमताजला मला टोचण्याची संधी मिळाली.

"तुला लागेल तितकं खाऊन घे." ती म्हणाली. "तुला इतकं आणि चांगलं खाणं राजेशकडून मिळणार नाही."

"कां नाही ? राजेश पैसे मिळवेल." मी म्हणाले.

"हो—हो. आणि मग तू चणेफुटाणे खाशील." मुमताज म्हणाली.

' चणे काही वाईट नाहीत.पौष्टिक असतात" फिरोज म्हणाला.

"सुप्रिया तू मूर्ख आहेस" मुमताज म्हणाली. "ज्याला काही बॅकग्राऊंड आहे असा सुसंस्कृत माणूस तुला मिळाला पाहिजे. तो तुझी नेहमी काळजी घेईल. तुला हव्या असणाऱ्या गोष्टी मिळविण्यासाठी बाहेर जावं लागणार नाही; पण तू आपली राजेशच्याच मागे लागलीस."

मी काहीच बोलले नाही.खाली मान घालून गपचूप जेवू लागले. फिरोज हसला. "समजा मी सुप्रिया असतो तर मी राजेशचा संबंध सोडला नसता आणि नव्या माणसाशी संबंध ठेवायला घाबरलो नसतो—आणि अशा गोष्टींसाठी राजेश काही आडकाठी घेईल असे मला वाटत नाही."

"तसं बिलकूल नाही. त्याला जर मी तुमच्याबरोबर फिरते हे समजलं तर तर तो लग्न मोडेल." मी काकुळतीला येऊन म्हणाले.

"का बरं लग्न मोडेल ?" मुमताजने विचारले.

"कारण त्याला मी तुझ्याबरोबर फिरलेलं त्याला आवडत नाही."

"मूर्ख, भिकारी, घाणेरडा, साल्याला माज चढलाय. सांगतेच त्याला जाऊन सुप्रिया माझ्याबरोबर फिरायला आली म्हणून."

"प्लीज. असं काही करू नकोस. तुझ्या पाया पडते." असं काही करायला मुमताज मागं पुढं पाहणार नाही हे मला माहीत होतं.

जेवत असताना रामने सारखा माझा डावा हात दाबायला सुरूवात केली. ते पाहून मुमताज हसू लागली. अरे बाबा ती राजेशशी एकनिष्ठ आहे. तिचा असा विनयभंग करू नकोस."

मी माझा हात सोडवण्याचा प्रयत्न केला पण रामने तो घट्ट पकडून धरला.

"त्याने तुझा हात हातात घेतला तर इतकं रागवायला काय झालं ?" फिरोज म्हणाला. जेवणाची ऑर्डर देऊन झाली होती. फिरोजने आपल्या बॅगमधून दारूची बाटली काढली. मी अगोदर केव्हाच दारू प्याले नव्हते. पण चव घ्यावी अशी इच्छा होती. मुमताजने ग्लास भरले. मी नको नको म्हटलं; पण शेवटी एकदाचा ग्लास तोंडाला लावला. प्रथम ती चव कशीशीच वाटली; पण एक घोट पोटात गेल्यावर बरं वाटलं. शरीर थोडसं गरम झालं. रामने माझा हात हातात घेतला. मी काही त्याला विरोध केला नाही. तसा राम माझ्याजवळ सरकला.

"राम तू सुप्रियाचं चुंबन घेतलं नाहीस तर मी तुझ्याशी बोलणार नाही." मुमताज म्हणाली.

" मला तुम्ही एकटीला सोडा पाहू ' मी घ बरून म्हणाले.

रामने मुमताजकडे पाहिलं.

"असं काय पहात राहिलास. हो पुढं."

रामने मला कमरेकडे घट्ट पकडून जवळ ओढले. त्याला मला चुंबायचे होते. एक अवाक्षरही न बोलता त्याच्या तावडीतून सुटायचा प्रयत्न केला. पण माझ्याहून तो जास्त तगडा होता. मी जितका सुटायचा प्रयत्न करत होतो तेवढा तो जास्त जवळ ओढत होता. जर मुमताजने त्याला मदत केली नसती तर त्याला माझं चुंबन घेताच आलं नसतं. मुमताज आपल्या जागेवरून उठून माझ्याकडे आली आणि तिने माझे हात घट्ट धरून ठेवले आणि ती हसत हसत ओरडली,"राम लवकर. आता तुला चान्स आहे."रामचं तोंड माझ्याजवळ आलं. मी माझं तोंड फिरविण्याचा प्रयत्न केला, पण ते जमलं नाही. रामने एका हाताने माझी हनुवटी वर उचलली आणि माझं दीर्घ चुंबन घेतलं.

"आता कसं ?" असं म्हणून मुमताज जागेवर जाऊन बसली.

"तुम्हा लोकांबरोबर मी आता केव्हाच येणार नाही." मी म्हणाले.









अनुक्रमणिका

"रामचा चेहरा बघ लिपस्टिकने लडबडला आहे काय ! आता जर का तो आला तर फार मजा येईल." मुमताज म्हणाली.

माझ्या ओठावरच्या लिप्स्टिकने रामचा चेहरा लडबडला होता. मुमताजने सांगितल्यामुळे त्याच्या चेहऱ्यावरची लिप्स्टिक नाईलाजाने मला पुसून काढावी लागली. लिप्स्टिक पुसताना जणू काहींच झालं नाही असं मी दाखवलं आणि इथंच माझी चूक झाली. कारण पुन्हा रामने माझ्या कमरेभोवती हात टाकला आणि जवळ ओढले.

"चल सोड मला."

"त्याने तुला जवळ ओढले तर असं काय वाईट होणार आहे ?" मुमताज म्हणाली, "नाहीतरी त्याने तुझं चुंबन घेतलंच आहे. त्याला त्याच्या मनासारखं वागू दे."

माझी इच्छा नसतांना मी बसून होते. रामचा हात माझ्या कटिभोवती होता. दरम्यान वेटर जेवण घेऊन आला. जेवण फार छान होतं. मुमताज माझ्या ग्लासात दारू ओतत होती आणि एखाद्या अट्टल पिणाऱ्याप्रमाणे मी फस्त करत होते. जेवण झाल्यावर स्वीट डीश आली. ती मी तावडतोब अधाशासारखी संपवली. रामने आपली डीश माझ्यापुढे केली आणि तीही मी नको नको म्हणत फस्त केली.

मुमताज पण खूप प्याली असल्यामुळे फिरोजशी लाडीगोडी लावत होती. ती त्याच्या तोंडात फळांच्या फोडी घालत होती आणि प्रत्येक वेळी चुंबन देत होती. त्यामुळे रामच्या माझ्या कमरेभोवती असलेल्या विळख्याचं काहीच वाटलं नाही. मुमताज प्रत्येक क्षणाला अशांत होत होती. ती फिरोजच्या मांडीवर जाऊन बसली. फिरोज ओरडला. मला हंसल्याशिवाय राहवेना. ह्यावेळपर्यंत रामने काहींच हालचाल केली नव्हती. आता त्याने माझ्या मानेवर, गालांवर, डोळ्यांच्या पापण्यावर चुंबनांचा वर्षाव करायला सुरुवात केली. मला गुंगी आलेली असल्याने त्याच्याशी झटापट करणं अशक्य होतं. आणि दुसरं म्हणजे त्याचा तो रानटी कामुकपणा मी स्वतःला पूर्णपणे विसरून पाहत होते. एखाद्या पुतळ्याप्रमाणे मी स्तब्ध होते. माझ्या त्या स्तब्धतेचा अर्थ माझी संमती आहे असा घेतला जात होता.

"सुप्रिया आता शहाण्यासारखं वागू लागली" मुमताज म्हणाली.

मी मुमताजला चांगलंच उत्तर देणार होते. पण माझ्या तोंडातून शब्दच बाहेर पडेनात. राम माझ्याकडे बघत होता. "चल त्या खोलीत जाऊन आराम करू" त्याचं लक्ष अर्धवट उघड्या असलेल्या खोलीकडे होतं. तो नशेत होता आणि तरीही त्याला माझा नकार समजला. "त्या खोलीत जाऊन आराम करू" झोपेत असल्याप्रमाणे तो बरळला.

मुमताज आणि फिरोज गप्पा मारायचं थांबवून आमच्याकडे पाहू लागली.

"जा ना. त्यात काय बिघडलं ?"

मी नशेत होते तरी मला रडू आलं. आत जाण्यात धोका आहे हे मला समजत होते. "मी नाही." मी उठून उभी राहिले.

राम मला ओढू लागला. मी त्याच्या हात सोडून पळून जायचा प्रयत्न केला, पण मुमताजने मला पकडलं.

"मी जाणार नाही."

"पण का ? त्यात असं वाईट काय आहे ?" फिरोज बोलला. मी त्याला सभ्य समजत होते.

मुमताज मला ढकलत होती.

राम तोंडातून एक एक शब्द उच्चारत म्हणाला, "तू जर आली नाहीस तर मी राजेशला सांगणार. तुझ्या शरीराचा मी उपभोग घेतला आहे."

तो असं काही केल्याशिवाय बिलकूल राहिला नसता, याची मला खात्री होती आणि त्यामुळे राजेशबरोबरच्या माझ्या संसाराचा तो सुरू होण्याआधीच त्याचा शेवट झाला असता. या मी साऱ्या गोष्टींचा विचार करू लागले आणि रामबद्दल वाटणाऱ्या किळसापेक्षा, माझ्याबद्दल त्याच्या मनात असलेल्या कामभावनेचा पगडा माझ्यावर बसू लागला. मी त्याच्या त्या इच्छेच्या जाळ्यात गुरफटू लागले. कारण मला माझ्या संसाराची, पुढल्या आयुष्याची सुद्धा काळजी वाटू लागली. माझं वैवाहिक जीवन सुखाचं व्हावं म्हणून मी वाटेल ती किंमत द्यायला तयार होते. माझ्यासारख्या कायद्याचे कसून पालन करणाऱ्या आयुष्यात चांगलं भविष्य पाहणाऱ्यांचा या जगात वाईट फायदा घेतला जातो हेच खरं !

माझं त्यावेळचं भविष्य मला समजलं होतं. मी दुःखी झाले होते. मनातल्या मनात रडत होते. आणि रामबरोबर खेचली जात होते.

"तू रडतेस ?" मुमताजने विचारलं "कुणाला वाटेल ही हिची पहिलीच वेळ आहे."

फिरोज हंसल्याचं मी पाहिलं. माझे डोळे भरून आले होते. रामबरोबर मी खोलीत गेले आणि रामने दरवाजा बंद करून घेतला.

आत जाताच मी हाताने माझा चेहरा झाकून घेतला. रामने माझे हात सोडवण्याचा प्रयत्न केला. अशा वेळी इतराना जशी वागायची इच्छा होते तसंच त्यालाही वागायचं होतं पण माझ्या चेहऱ्यावरून हात बाजूला करण्याच्या नकारामुळे त्यानं घाई करायला सुरुवात केली. मला गोंजारण्याचा, लाडीगोडी लावण्याचा प्रयत्न केल्यावर त्यानं मला बिछान्यावर लोटलं.

मला मात्र एक गोष्ट कबूल करायला हवी. रामने मला त्यावेळी जास्तीत जास्त सुख द्यायचा प्रयत्न केला. राजेशपेक्षा त्याने नक्कीच मला जास्त सुख दिलं. त्याचं शरीर कंप पावत होतं. त्याच्या तोंडा-तून माझ्यावर प्रेमाचा सारखा वर्षाव होत होता. माझे डोळे सताड उघडे होते. माझी नशा केव्हांच उतरली होती. राम मला गोंजारत असताना मी माझ्या विचारात गढून गेले. मला डोळ्यासमोर माझी झोपण्याची खोली दिसू लागली. मी माझ्या नव्या फर्निचरचे पैसे जवळजवळ फेडत आले होते.

"आता उठायला हवं." खोलीत शिरल्यानंतर मी प्रथमच बोलत होते.

"का माझ्यावर तू रागवलीस?" त्याने हळू आवाजात विचारलं.

"नाही."

"तू माझा द्वेष करतेस ?"

"नाही."

"मी तुझ्यावर इतकं प्रेम करतो" तो पुटपुटला. पुन्हा एकदा कामुकतेने तो माझ्या चेहऱ्याची चुंबने घेऊ लागला. मी त्याच्या इच्छेप्रमाणे त्याला वागू दिलं आणि नंतर म्हटलं, "आता आपण गेलंच पाहिजे."

तो माझ्यापासून दूर झाला. त्याने कपडे घालावयास सुरुवात केली. मी माझे केस बांधले. वॉश बेसिनवर जाऊन चेहरा धुतला. माझे डोळे रडल्यामुळे लाल दिसत होते. राम तयार होता. माझी तयारी झालेली पाहून त्याने दरवाजा उघडला आणि माझ्याकडे न पाहता तो बाहेर पडला.

मुमताज आणि फिरोजने माझे अभिनंदन केले.

"आपण त्या गावची नाही असं दाखवत होती प्रथम, मग इतका तमाशा करायची काय गरज होती ?"

मी तिच्याकडे पाहिलं. तिच्या त्या दुटप्पी वागण्याचा मला राग आला. तिनंच माझा हात धरून रामला माझं चुंबन घ्यायला लावलं होतं.

"मुमताज असं कुणाला चिडवणं बरं नाही. तूच तिची मनधरणी करून सारं करायला लावलंस अणि आता तूच तिला दोष देतेस." फिरोज म्हणाला.

"तिलाच मी दोष देणार. तिची जर इच्छा नसती तर काळ सुद्धा तिला तसं करायला घजला नसता पण तिची इच्छा होती आणि ती नखरा करीत होती." तिने माझ्याकडे तिटकाऱ्याने पाहिले.

मी काहीच बोलले नाही. संतापाने मनातल्या मनात दग्ध झाले होते. राम जवळ आला. त्याने माझे हात पकडले, मी त्याला ढक-लून दिलं आणि एका कोपऱ्यात बसले.

"रामचा चेहरा मयताला जाऊन आलेला दिसतो." फिरोज म्हणाला.

रामला माझं दुःख समजलं होतं. "तुला नेहमी साऱ्याच गोष्टींची टर उडवायची असते." तो फिरोजला म्हणाला.

"मग तुझं म्हणणं काय आम्ही रडावं ?" मुमताज बोलली. "आता तुम्ही दोघं इथं अंगठे चोखत बसा. आम्ही येतो जाऊन."

मुमताजच्या मागे फिरोज पळाला.

आता आम्ही दोघंच राहिलो. टेबलाच्या एका टोकाला मी आणि दुसऱ्या टोकाला राम बसला. अस्ताला जाणाऱ्या सूर्याची किरणं खिडकीतून टेबलावर ठेवलेल्या काचेच्या भांड्यावर पडली आणि परावर्तीत होऊन रामच्या तोंडावर उजेड पडला. त्याचा चेहरा कोमेजला होता. त्याची इच्छा पूर्ण झाली होती. पण माझा उपभोग घेण्यापूर्वी त्याच्या डोळ्यात दिसणारं दुःख अजू-नही तसंच होतं. त्यानं माझं मन दुखावलं होतं. माझा बळजबरीने उपभोग घेतला होता. तरीपण मला त्याची दया आली. माझा उपभोग घेण्यापूर्वी तो जितका दुःखी होता तितकाच आताही दिसत होता. तेव्हां त्याला मी हवे होते म्हणून तो दुःखी होता. आणि आता त्याच्या प्रेमाचा मी स्वीकार केला नाही म्हणून दुःखी होता. तिरस्कार हा प्रेमाचा मोठा शत्रू आहे. मी जर त्याचा तिरस्कार केला असता, तर त्याच्याकडे एक दिवस नक्कीच येईन असं त्याला वाटलं असतं. पण मी त्याचा तिरस्कार केला नव्हता. उलट मला त्याचीच दया आली होती. त्यामुळे त्याच्या बद्दल दुसऱ्या कोणत्याही भावनेचा शिरकाव झाला नाही.

मुमताज आणि फिरोज येण्याची वाट पाहात आम्ही दोघं खूप वेळ बसून राहिलो. राम सारखा सिगरेट ओढत होता. त्या सिग-रेटच्या धुरातून माझ्याकडे काहीतरी सांगायच्या नजरेने तो पाहात होता. पण तो काहीच बोलला नाही. मला केव्हा एकदा तिथून निघतो असं झालं होतं. मला एकटं बसून शांतपणे झाल्या गोष्टीचा विचार करायचा होता. माझाच मला राग आला होता.

"तू कशाचा विचार करतोस ?" रामने विचारले.

मी थोडा वेळ थांबले आणि म्हणाले, "माझ्या हाताच्या एका बोटाचं नख तुटलं आहे. ते केव्हा आणि कसं तुटलं याचा मी विचार करतेय." त्याने माझ्याकडे आंबट चेहऱ्याने पाहिलं आणि माझ्याशी बोलायचा विचार सोडून दिला.

शेवटी एकदा मुमताज आणि फिरोज खोलीतून बाहेर आले. कामतृप्ती झाल्याने त्यांच्या चेहऱ्यावर समाधान झळकत होते. आम्हाला असं शांत बसलेलं पाहून त्यांना आश्चर्य वाटलं. मुमताजने माझ्या चेहऱ्यावरून हात फिरवला आणि मला जवळ ओढले. "तू अशी ओढग्रस्त कां वाटतेस ?"

"मी दमले आहे." मी म्हणाले. काही वेळ आम्ही हॉटेलच्या दारात उभे राहिलो, ते दोघे पुरुष गाडीत बसल्यावर ती म्हणाली "तू माझ्यावर रागवलीस नाहीस ना ?"

"नाही. तुझ्यावर कशाला रागवू मी ?" तिने केलेला कट चांगल्यापैकी पार पडला होता. तिला समाधान झालं होतं आणि मी रागावू नये असं तिला वाटत होतं." तुझ्याशी न बोलतेपणा कशाला घेणार ? तूच तर सांगत होतीस, राजेशला सोड आणि रामकडे रहा."

"मला अजूनही तसंच वाटतं." ती म्हणाली.

"मला भीती वाटते. झाल्या गोष्टीबद्दल राजेश मला क्षमा करणार नाही. आणि तुझं मन मला मोडवत नाही. कदाचित राजेशला सोडून रामला पकडावं हे तुझं म्हणणं खरं असावं."

( पान ६४ वर पहा )






# एक 'कडक' नाटक

'आऊट ऑफ् द वे' जाऊन लिहिण्याची काही नवे, काहीसे बोल्ड आणि ब्लंट असे जीवनाचे अनुभव शब्दांकित करण्याची विजय तेंडुलकरांच्या प्रतिभेत ताकद आहे. भोवतालच्या उध्वस्त–विश्वात कुचंबलेल्या, भावनांचं मरण पाहणाऱ्या आणि त्यामुळे जीवनातला कोरडेपणा वाटचाला आलेल्या माणसांच्या व्यथा तेंडुलकर यांना दिसतात, भावतात, अस्वस्थ करतात आणि अशा अस्वस्थेतून प्रभावी नाटच उत्पन्न होते. भीषण, ओंगळ, सडके–कुजके जीवन ज्यांच्या वाटचाला आले आहे अशांना सुद्धा 'रंगमंचा'च्या आरशातले त्याचे प्रतिबिंब पाहवत नाही. ती अस्वस्थ होतात. आणि मग त्या आरशावर धावून जातात. आरसा फुटत नाही. तो फक्त हसतो. म्हणतो 'तुमचेच तर रूप दाखविले. मग इतके अस्वस्थ का ?''

श्री. विजय तेंडुलकर यांचे 'गिधाडे' हे नाटक असेच बोल्ड, ब्लंट, भेदक, मनाला ओरबाडून काढणारे, अस्वस्थ करणारे, अंतर्मुख व्हायला लावणारे आहे असे मला वाटते. त्या नाटकात माणसात दडलेल्या गिधाडी वृत्तीचे काहीसे भडक वाटणारे, एकांगी स्वरूपाचे व त्यामुळे गौण वाटावे असे, काहीसे आक्रस्ताळी वाटण्याइतपत, भडक असे चित्रण केले आहे. ही सारी कथा एका वास्तूत, एका कुटुंबात आणि जवळजवळ सख्ख्या नात्याच्या माणसात घडते. याठिकाणी अनुभवविश्व एका कुटुंबापुरते सीमित दिसत असले तरीही तो अनुभव मात्र सीमित स्वरूपाचा नाही. तसा तो व्यापक स्वरूपाचा असा आहे. त्या नाटकात व त्या कुटुंबात जे घडते ते माणसातला पशु, राक्षस वा माणसातले गिधाड पेटले तर कुठेही, केव्हाही घडू शकेल असेच आहे. एका अर्थाने प्रत्येक अनुभव तसा वैयक्तिक वा सीमितच असतो. आणि काही एका संदर्भात तो व्यापक, युनिव्हर्सलही होऊ शकतो. ह्या कुटुंबातला बाप हे गिधाड क्रमांक एक–म्हातारे झालेले. पण गिधाडी पीळ न गमावलेले. ह्या गिधाडाने भावाबरोबर भागीदारीत धंदा केला. पण भावाला मात्र सतत ठकवले आणि शेवटी जीवनातून उठवले. पैसा बाळगला, वाढविला आणि मग मुलाबाळांचे कल्याण करतो अशा आविर्भावात तो वाटून टाकला. "सारा पैसा मी तुम्हाला दिला" असे म्हणत म्हणत, खाली मान घालून सारे मुकाटचाने पहात, शिव्या पचवीत हे म्हातारे गिधाड घरात वावरते. थोरला भाऊ (रमाकांत) हे गिधाड क्रमांक दोन ! अस्सल गिधाड, तीक्ष्ण चोचीचे आणि आग ओकणाऱ्या डोळ्यांचे ! तसे गोडबोले. खरं तर ह्या नाटकातली सारीच गिधाडे तशी मोठी गोडबोली, स्टायलिश, पॉलिशड्, वरकरणी 'सद्‌गृहस्थ' वाटावीत अशी ! तसाच हा थोरला भाऊ. बहीण, भाऊ, पत्नी, बाप–साऱ्यांना वरकरणी 'डिअर' म्हणून संबोधणारा. पण ते 'डिअर' जहर घेऊन येते. आणि सारे कुटुंबच शेवटी उध्वस्त होते. धाकटा भाऊ (उमाकांत) नपुसक असलेला सूचित केलेला आहे. पण त्याच्याही मनातले गिधाड मात्र 'सबल' आहे. क्रियाशील आहे. बहीण (माणिक) वयाने वाढलेली, अधिक कामातुर असलेली, काहीशी बेदरकार, पुरुषी ! ही सारी माणसे एकाच कुटुंबात



आहेत, त्यांना सत्तेचे घर आहे म्हणूनच ती घरी येतात. पण एखाद्या हॉटेलमध्ये जसे प्रवासी येतात, कामापुरते बोलतात, काम साधले की तितक्याच कोरडेपणाने निघून जातात–गुंतणं नाही ! इथेही हेच घडते. पण इथे जेव्हा माणसे एकमेकात गुंततात तेव्हा ती एकमेकांना पाडून पाठीत खंजीर खुपसण्यासाठीच ! ह्या साऱ्या पार्श्वभूमीवर कुचंबलेली दोन माणसे त्या घरात आहेत. एक रजनीनाथ आणि दुसरी रमा ! रजनीनाथ हा म्हाताऱ्या गिधाडाचा अनौरस मुलगा. गुणी, कर्तबगार, काव्यात्म कोवळीक लाभलेला, कष्टाळू ! तर रमा ही जणु नवी सिंधूच ! "हे कारटं रामलालचं आहे" हे वाक्य तिच्याही नशिबी आलं आहे. फक्त ते कार्टं जन्माआधीच मारलं जातं. गिधाडांच्या पार्श्वभूमीवर भावनांची कोवळीक जपणारी अशी ही दोन माणसे ! नाजुक अनुबंध असलेली पण अखेरीस ते अनुबंध संघर्षात सापडतात आणि अधिक घट्ट होतात. त्यांचे मनात सुप्तपणे वावरत असलेले धागे एकत्र गुंफले जातात. आणि गर्भाचा गोफ विणला जातो. बापाला बाप न मानणारी, किंबहुना रक्ताचे कुठलेच नाते न मानणारे असे हे लोक. निगरगट्ट, भावनाशून्य दगड. त्यांच्या डाव–प्रतिडावातून हे नाटक घडते. त्यात बापाचा 'राखीव' पैसा काढण्यासाठी दोन भावांनी बहिणीच्या साथसाक्षीने केलेला हल्ला, बहिणीचा गर्भ 'एक्सप्लॉइट' करता येत नाही म्हणून तो नाहीसा करणे, रमाचा गर्भ रजनीनाथचा म्हणून त्याचा नाश, भावाला विश्वासात न घेता केलेले आर्थिक व्यवहार, काकाचा घात आणि तुफान मद्य पिणे, खोटे चेक देणे आदि अनेक कृत्यांनी हे नाटक गिधाडांचे दर्शन घडविते. हे दर्शन घडवितांना जी परिभाषा वापरली आहे त्याबद्दल काहींनी तक्रार नोंदविली आहे. परंतु प्रत्येक कलाकृति आपली 'परिभाषा' व आपला 'फॉर्म' घेऊन येते असे मला वाटते. गिधाडांच्या साऱ्या हालचाली, कृति आणि मानसिक बैठक ध्यानी घेतली तर त्यांच्या तोंडच्या शिव्या तार्किक दृष्टचा न्याय्य ठरतील. भडक चित्रण, रंगमंचावरील काही प्रसंगीचा त्याचा भडक आविष्कार ह्याबद्दलही आक्षेप घेतले गेले आहेत. - तेंडुलकर हे काही नवोदित व नवथर लेखक नाहीत. जीवन हे काही एकरंगी असत नाही, माणूस हा नुसताच दुष्ट वा सज्जन असत नाही हे कळण्याइतकी जाण तेंडुलकरांत खासच आहे. मग त्यानी असे का लिहीले आहे ? 'गिधाडे' ह्या शीर्षकातच त्याचे उत्तर मिळते असे मला वाटते. काही माणसे ह्या मानवी कळपात अशी असू शकतात की नाही ? असतात–मग त्यांचेच हे चित्रण का मानू नये ? भडक चित्रणाबद्दलही मला गवसलेले उत्तर असे की, तसे ते केले नसते तर 'गिधाडां'चा खोल व






अस्वस्थ करणारा ठसा मनावर उमटला नसता. ह्या गिधाडांच्या शोकांतिकेने दीर्घकाळ अस्वस्थ असलेली अनेक माणसे मी पाहिली आहेत. काही माणसे नुसतीच 'देव' असतात. मग काही नुसतीच 'गिधाडे' असतील हे का गृहीत धरू नयेत ? त्यात त्यांची वकिली केलेली नाही तर समर्थ व ब्लंट चित्रण केले आहे. ते दर्शन अंतर्मुख करते. काही वेळा ओंगळपणातून, भयानकतेतून उबग उत्पन्न होते. चीड, कणवही ! तेंडुलकरांचा हेतु हाच असेल असे वाटते. तो असेल तर तो सावला आहे. रजनीनाथ–रमा यांच्यातल्या नाजुक नात्याचे फार सूचक, समर्थ, कोवळे चित्रण तेंडुलकरांनी केले आहे. ते प्रसंग 'गिधाडी' पार्श्वभूमीवर सहानुभूति जिंकतात. इतके ते कोवळिकीचे व काव्यात्म ! रजनीनाथचा नाटकात याहून अधिक उपयोग करून घेता आला नसता काय ? काव्यात्म निवेदन, परिचय–भाष्ये व रमेशी त्याचे उत्कट नाते येवढे पुरेसे वाटत नाही. तो त्या घरातलाच अनौरस का होईना–पण घटक आहे. त्या घराच्या सुखदुःखांबावत त्याला अधिक जवळ आणला असता तर संघर्ष वाढण्याचे दृष्टीनेही कदाचित् त्याचा उपयोग झाला असता. आणि त्या कथावस्तूशी त्याची एकरूपता (आयडेंटिफिकेशन्) साधली असती असे वाटते. 'मद्या'चा वापरही फार ताणला आहे असे वाटत राहते. 'प्लॅस्टर'-मध्ये पाय अडकलेली वहीण गर्भपातानंतर किंचाळत पण पळत रंगमंचावर येते आणि मग तिचे गिधाड विव्हळत घराबाहेर पडते. बापाचे व तिचे रजनीनाथकडे येणे हे पुरेसे एकसंध वाटले नाही. पॅचसारखे वाटले.

डॉ. श्रीराम लागू हे ह्या नाटकाचे दिग्दर्शन व एक प्रमुख गिधाड–रमाकांत ! डॉ. लागूंच्या अनेक भूमिका मी पाहिल्या आहेत. ह्या नाटकातल्या रमाकांताची त्यांची भूमिका अभिनय, बेअरिंग, शब्दावरची सत्ता, हालचाली सर्वच दृष्टीने खिळवून ठेवणारी वाटली. तसे हे नाटक गंभीर–अति गंभीर, अस्वस्थ करणारे. पण डॉ. लागू, हट्टंगडी, दीपा वसरुर, मीना सुखटणकर, अशोक साठे ही माणसे इतकी समरसून कामे करतात की तो ताण सुसह्य, सुखद वाटतो. त्या साऱ्या संचात काहीसे कमी पडतात ते कागरकर.

वापू लिमये यांच्या नेपथ्याचा खास उल्लेख करायला हवा. त्या घराचा सेट, फर्निचर, झाडे रजनीनाथची वेगळी खोली आदि गोष्टी त्यांनी ह्या नाटकाला जशा हव्यात तशा आणि तशाच पुरविल्या आहेत त्या घराच्या 'संस्कृती'ला साजेसे नेपथ्य लाभले आहे–अपवाद फक्त दारूच्या वाटल्यांबावत ! तो प्रकार फारसा तर्कसंगत वाटला नाही. प्रकाशयोजना–राम मुंगी व अशोक साठे यांची होती. ती परिणामकारक व प्रसंगनिष्ठ अशीच वाटली.

थिएटर युनिट, तेंडुलकर व डॉ. लागू (आणि कंपनी) यांचे ह्या 'धाडसी' प्रयत्नाबद्दल 'कडक' अभिनंदन ! !

**– चित्रगुप्त**

---

(पृष्ठ ६२ वरून —**सुप्रिया** )

तिचं समाधान झालं. तिनं मला जवळ ओढलं आणि ती कानात म्हणाली, "राम किंवा दुसरा कोणीही असू दे; पण तू राजेशला सोड. तुझ्यासारखी चांगली मुलगी वाया जाते याचं मला वाईट वाटतं. फिरोजला विचार तुझ्यासाठी मी त्याच्याशी बोलत असते." ती मोकळेपणाने बोलत होती. तिचं सारं म्हणणं मला पटतंय असं मी दाखवत होते. आम्ही बोलत बोलत गाडीत बसलो आणि गाडी सुरू झाली.

परतताना कुणीच बोललं नाही. राम सारखा माझ्याकडे पहात होता. त्याच्या डोळ्यात दुःख होतं. मला त्याच्याशी बोलावसं वाटलं. गाडीच्या खिडकीतून वाऱ्याचा झोत माझ्या चेहऱ्यावर आपटत होता. मी रस्त्यावरचे मैलाचे दगड मोजू लागले. काही वेळाने रामचा हात माझ्या हाताला घासू लागला. माझ्या हातात काहीतरी ठेवायचा प्रयत्न करत होता. माझ्याशी बोलायला घावरत असल्याने ते पत्र असावं असं मला वाटलं पण त्या नोटा होत्या. त्या माझ्या पंजात घट्ट दाबून धरण्यासाठी उघडत असताना त्याने माझ्याकडे पाहिले. त्याच्या तोंडात एक मारावी असे मला वाटलं पण तिथल्या तिथे तो विचार मी दाबला. त्यावेळी असं वागणं मूर्खपणाचं होतं. मी त्या नोटा घेतल्या. शंभराच्या तीन एका वेळी इतके पैसे माझ्या हातात मिळाले होते.. ते पैसे घेताना मी गोंधळून गेले होते. माझा जीव घावरला होता. पण त्यावेळचा तो अनुभव पुढे केव्हाही परकी पुरुषाकडून पैसे घेताना आला नाही. तो अनुभव म्हणजे भावनांची गुंतागुंत होती. रामबरोबर झोपले असताना, माझ्या मनात निर्माण झालेली वासना माझ्या मनात पुन्हा केव्हाही निर्माण झाली नाही.

मी पैसे परत करायला हवे होते; पण त्याचवेळी मला पैसे ठेऊन घेण्याची इच्छा झाली. मी पैशाची आधाशी नव्हते, पण त्या पैशापासून मला एका नव्या प्रकारचा आनंद मिळाला होता.

पैसे घेण्याचं माझ्या मनातून होतं तरी तसं मी दाखवलं नाही. त्या नोटा मी त्याच्याकडे सारल्या. मी त्या नोटा घ्याव्या म्हणून रामने डोळ्याने मला विनवणी केली. त्या नोटा मग मी उजव्या हातातून डाव्या हातात घेतल्या. ते पैसे घेताना मला एक प्रकारचा अवर्णनीय आनंद झाला. मी भारून गेले. माझा चेहरा लाल झाला. त्यावेळी रामने माझ्याकडे पाहिले असते तर त्याला वाटलं असतं मी त्याच्यावर खरंच प्रेम करतेय ! पैसे घेतल्यावर रामने माझा हात आपल्या हातात घेतला आणि त्याचं चुंबन घेतलं. मी त्याच्यापासून दूर झाले.

शहरात पोहोचल्यावर, जसा काही मोठा गुन्हा करून आम्ही आलो आहोत असा चेहरा करून प्रत्येकाने निरोप घेतला. खरं पाहिलं तर आम्ही गुन्हाच केला होता. फिरोजने दुष्टपणामुळे, मुमताजने असूयेमुळे, रामने वासनेमुळे आणि मी मला नसलेल्या अनुभवामुळे गुन्हा केला होता. मुमताजने दुसऱ्या दिवशी भेटायचं माझ्याकडून वचन घेतलं. घरी पोहोचल्यावर मला आनंद झाला. मी खोलीत जाऊन स्वतःला बंद करून घेतलं. प्रथम जर मी काय केलं असेल त्या नोटांकडे भरल्या डोळ्याने पाहिले. शंभर रुपयांच्या त्या तीन नोटांकडे पाहून मला समाधान वाटले. त्या पैशातून मला माझ्या फर्निचरचे उरलेले हप्ते भरायला मिळणार होते. आणि शिवाय काही निकडीच्या गोष्टी पण घ्यायला मिळणार होत्या. इतके पैसे माझ्या आयुष्यात मी प्रथमच पाहात होते. ते पैसे माझे आहेत, माझ्या स्वतःच्या कमाईचे आहेत त्याच्यावर माझा विश्वास बसत नव्हता.

**(क्रमशः)**








## राजकीय वादळे, धरणीकंप

नृपनीती ही वारांगनेसारखी असते अशा अर्थाचे एक संस्कृत वचन आहे. आणि शतके लोटली, जग पुढे गेलं, पुरोगामी का कायसं म्हणतात तेही झाल, सुसंस्कृत झालं. बरेचसे समान आणि समाजवादही बोलले जाऊ लागले. युनोमुळे 'जगमैत्री'चे दरवाजे खडाखड उघडले आणि टीचभर राष्ट्रेही खंडीभर श्रीमंतीच्या राष्ट्रांच्या मांडीला मांडी लावून बसू लागली. तरीही वरील संस्कृत वचन मात्र अजूनही 'अ–जून' राहिले आहे. नृपनीती तशी असते आणि राजकारणात शाश्वत, सनातन, कायमचे, मौलिक, नैतिक आणि कायमचे बंधनकारक, मनापासूनचे असे काही असत नाही. हे रंग ज्यांना ओळखता येत नाहीत वा मानण्याची इच्छा नसते अशांनी त्या वाटेला न गेलेले बरे असे वाटते. तीच ती चर्पटपंजरी लावणारांना हे राजकारणी जग मूर्ख वा बेअक्कल तरी म्हणते वा पोरकट तरी !

अशा ह्या 'वारांगनैव' राजकारणाच्या क्षेत्रात गेल्या महिन्यात प्रचंड उलथापालथी झाल्या. त्यातल्या काही दिल्लीत झाल्या, काही गल्लीत झाल्या तर काही (गोव्यासारख्या) बोळातही झाल्या. मोठा हादरा बसला तो दिल्लीत आणि काहीसा सौम्य बसला तो गल्लीत ! दिल्लीतल्या धरणीकंपात काही महाकाय घरेही कोसळली. जमीनदोस्त झाली. उरल्या फक्त कमानी, पडक्या भिंती. घर होते हे दाखविण्यापुरत्याच ! भारताच्या पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी यांनी हा धरणीकंप घडवून आणला. एरव्ही पंतप्रधान हा देशाचा घटनात्मक प्रमुख असल्याने त्याला मंत्रिमंडळात अशा उलथापालथी करण्याचा अधिकार आहे हे लोकशाही मानते. मग त्यात चर्चेसारखे काय ? माणसे आली–गेली–काही राहिली संपलं ! सर्वसामान्य लोकजीवन चालू होते तसेच चालू राहिले आहे. राहील. कारण ह्या वरच्या उलथापालथीचे 'डायरेक्ट' धक्के जनसामान्याला बसत नाहीत.



आणि तरीही पंतप्रधान इंदिराजींच्या ह्या उलथापालथी बाबत बरीच चर्चा झाली व चालू आहे. हिमालयाच्या संरक्षणासाठी धावून गेलेला सह्याद्रि अखेर परक्यांनी गिळंकृत केलेल्या भूमीपैकी एक इंचही भूमी मुक्त करू शकला नाही. चीन–पाकच्या आक्रमणाचे जळते निखारे अजूनही लडाख, अकसाई चीन, नेफामध्ये धुमसत आहेत. काश्मीरमधली आग विझली नाही, उलट दिवसाढवळ्या प्रचंड आगीचे सत्र गेले काही महिने तेथे चालू आहे. तरीही पण 'छुपे रुस्तम' मेनन बाजूला झाल्यावर धावलेल्या सह्याद्रीच्या एकूण (एअर) डॅशमुळे चीनने माघार घेतली असावी. संरक्षणाची कामगिरी यशस्वीपणे पार पाडल्याबद्दल सह्याद्रीला गृहखाते बक्षीस मिळाले. पण आपल्या घरात माजलेल्या घरभेद्यांनी ह्या शांत सह्याद्रीला एक दिवस सुखाची झोप लाभू दिली नाही. जातीयवाद, नक्षलवाद, सीमावाद, सत्तावाद, आदि अनेक वाद आणि 'बंद'ना सह्याद्रीला तोंड द्यावे लागले. ताण फार पडला (असावा) अशा समजुतीने नव्या उलथापालथीत सह्याद्रीला त्याचा 'अर्थाअर्थी' संबंध नसलेले 'अर्थ' खाते देण्यात आले आहे. ह्या खातेपालटात ना. यशवंतराव चव्हाणांबरोबरच परराष्ट्रमंत्री दिनेशसिंग, मियाँ फक्रुद्दीन अली अहमद, जगजीवनराम, स्वर्णसिंग यांचेही खातेपालट झाले आहेत. दिनेशसिंग हे इंदिराजींच्या खास मर्जीतले म्हणून ओळखले जात. पण त्यांचे खाते काढून घेताच त्यांनी राजिनाम्याचा फार्स केला. पण आपल्या रुसव्या फुगव्याची आता 'सर्वेसर्वा' बनलेल्या इंदिराजींना तमा नाही हे ध्यानी येताच रुसलेले दिनेशसिंग हसत खुर्चीवर येऊन बसले– अर्थातच बाईंनी सांगितले त्या ! भारताला स्वतःची स्वतंत्र, तर्कशुद्ध आणि अनुभवसिद्ध अशी 'व्यवहारी' स्वरुपाची परराष्ट्रनीती कधी लाभलीच नाही. पंडितजी असताना परदेशात अनेक वकिलातींचे पांढरे हत्ती पोसूनही 'काश्मीरपासून' ते थेट कच्छ–नेफा आक्रमणापर्यंत आम्ही 'एकटे आणि एकाकी' होतो ही वस्तुस्थिती आहे. आता इंदिराजी 'परराष्ट्र नीती''चे संचालन करतात. मग मंत्री दिनेश असले वा दुसरे कुणी असले तरी काय होय ? जगजीवनराम हे नवे संरक्षणमंत्री झाले आहेत. ते नव-काँग्रेसचे अध्यक्षही आहेत. ''ते अध्यक्षपद सोडणार'' म्हणून मधून मधून आवई उठते वा उठवली जाते. पण अध्यक्ष+संरक्षणमंत्री असलेल्या जगजीवनबाबूंना उपपंतप्रधानपद हवे होते. ते मिळाले नाही. अध्यक्ष म्हणून व गेली चाळीस वर्षे काँग्रेसची धोरणे आखणारा ज्येष्ठ सहकारी म्हणून (चाळीस वर्षाचा हा उल्लेख बाबूजींचाच) त्यांची सल्ला मसलत घेणे आवश्यक होते असे बाबूजींचे मत. पण पंतप्रधान आता 'रिंगमास्टर' आहेत. 'सर्वेसर्वा' आहेत. त्यामुळे त्यांची इच्छा व मर्जी सांभाळून ही सारी माणसे सांगितले गेले त्या खुर्चीवर मोठ्या आदबीने बसली. समाजवादी आर्थिक कार्यक्रमाची हिरिरीने वकिली केल्याबद्दल ना. यशवंतरावांकडे कार्यवाहीचे काम सोपवले गेले असा आभास उत्पन्न केला गेला आहे. प्रतिबंधक स्थानबद्धतेचा कायदा आज







डांगे–भूपेश रोखू शकतात आणि "राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचा" धोका नक्षलवाद्यां इतकाच मोठा व भयानक असल्याचा साक्षात्कार सारे 'नक्षली' थेर शांतपणे सहन करणाऱ्या भारताच्या (एकेकाळच्या) गृहमंत्र्याला होतो. हे सारे कशासाठी? संघ-जनसंघवाल्यांनी काय गांधीचे पुतळे फोडले? गांधी साहित्य जाळले? देश-भर सशस्त्र हल्ल्यांची एक मालिका उत्पन्न केली? कॉलेजे व विद्यापीठांच्या कचेऱ्या जाळल्या? आषुतोष मुकर्जी-सारख्यांच्या पुतळ्याचे विध्वंसन केले? माओच्या सेना नेफातून खाली उतरल्या तर त्यांच्या स्वागतार्थ रस्तोरस्ती लाल (वा भगवे) गालिचे पसरण्याच्या प्रतिज्ञा केल्या? विरोधी जनांची सामुदायिक कत्तल करण्याचे कट रचले? घराघरातून बॉम्बचे कारखाने काढले? पण ना. चव्हाण यांचे गृहखाते गेले खरे. त्या साऱ्या उलथापालथीत जास्त विटं-बना चव्हाणांची झाली असेच सारेजण-मानतात. गृहखात्याच्या अखत्यारीतली अनेक महत्वाची खाती पंतप्रधानांनी स्वतःकडे घेतली आहेत व सर्व हालचालीत सर्वंकष सत्ता केंद्रित करण्याचा एक धूर्त प्रयत्न आहे. संघ–शिवसेना फॅसिस्ट आहे. आणि वाजपेयी हिटलरसारखे हात उंच करून बोलतात (इंदिराजींनी हिटलर पाहिला आहे असे त्याच म्हणतात) म्हणून इंदिराजी व त्यांचे लाल (सगे) सोयरे सतत सांगत असतात. पण ह्या सर्व प्रकरणी पंतप्रधानांनी किती सत्ता केंद्रित करून घेतली आहे ते पाहणे मनोरंजक व उद्बोधक ठरेल. आज त्या इंग्लंडचे पंतप्रधान व अमेरिकन अध्यक्षांपेक्षाही अधिक 'पॉवरबाज' झाल्या आहेत. पंत-प्रधानपद व गृहमंत्रीपद त्यांचे ठायी एक-वटले आहे. गृहखात्यातील सा. वी. आय्, रेव्हेन्यु इंटलिजन्स, लायसेन्सिंग, आणि नेमणुकांबाबतचे सर्वाधिकार त्यांनी स्वतः-कडे (पंतप्रधान) घेतले आहेत. त्याशिवाय शिक्षणातील सी. एस्. आय्. आर्. व संरक्षण उत्पादनातील 'अणू विभाग' स्वतःकडे घेतला आहे. यासारखी महत्वाची सर्व शस्त्रास्त्रे आपल्या भात्यात घेतल्या-नंतर त्या देशातले सारे 'हेरखाते' व 'पैसा' यांचा सर्वाधिकार संपादू शकल्या आहेत. मंत्रिमंडळातील लाल–गुलाबी मंडळींच्या सल्ल्याने व सहकार्याने पंतप्रधान ह्या शस्त्रास्त्रांचा वापर करणार आहेत–हेतु अर्थातच सर्वंकष सत्ता संपादनाचा!

गतवर्षीपासून सुरू झालेल्या सत्तेच्या स्पर्धेचे व राजकारणाचे एक पर्व हे असे संपले. राजकारण हे वारांगनेसारखे असते याची ग्वाही देत संपले.

महाराष्ट्र काँग्रेसच्या अधिवेशना-नंतर मुंबईत धमाल उडाली. ना. बाळा-साहेब देसाई यांनी मंत्रिपदाचा राजिनामा दिला. तो देताना त्यांनी विजेच्या गतीने हालचाली केल्या. निःस्पृहतेचा, स्वाभि-मानाचा एक नवा आदर्श त्यांनी घालून दिला. मुख्यमंत्री येईपर्यंत ते मुंबईत थांबले नाहीत आणि तडक सामान बांधून खाजगी मोटारने ते स्वग्रामी निघून गेले. एकदम निरोपच–रेंगाळणे नाही. पत्रा-पत्री नाही–गाठीभेटी नाही. एकदम त्याग-पत्र! सतत चौदा वर्षे मंत्रिपद भोगल्या-नंतर असे निघून जाणे वाटते इतके (ह्ये देशी तरी) सोपे राहिलेले नाही. 'खुर्ची-धर्म' हा एकच धर्म ह्या तथाकथित निधर्मी राज्यात मानला जातो. खुर्ची हे एकच दैवत इथे मोठे ठरले आहे. त्यामुळे बाळा-साहेब देसाई ह्यांनी दिलेले त्यागपत्र धैर्याचे व त्यांची प्रतिमा उजळणारे ठरले. त्यांच्या त्यागपत्राने महाराष्ट्रातील इंडिकेट काँग्रेस-मध्येही सर्वत्र 'आलबेल' नाही हे सिद्ध झाले ते आता कोठे जातात? काय कर-तात? विरोधी कँपमध्ये जातात की केंद्रीय मंत्रिमंडळात त्यांना पाचारण केले जाते ते ठरत आहे. त्यांनी दिलेल्या राजि-नाम्यावाबत स्वागत, सत्कार, हरताळादि काही सोहळे झाले आणि आता "आम्ही त्यात नव्हतो हो" असे दाखविण्याची केविल-वाणी धडपडही काही शूरवीर करीत आहेत. एक गोष्ट यातून जाणवते ती अशी की, ना. देसाई ह्यांच्या राजिनाम्या-मागे काही सूत्रधार असण्याची शक्यता आहे. बाळासाहेबांच्या राजिनाम्याने एक-दर प्रचंड उलथापालथ होईल अशी अपेक्षा होती. ती फोल ठरली. जे वादळ उठले ते चहाच्या पेल्यातले ठरले. आणि आता दिल्लीतले खास दूत रवाना होत आहेत. आता साऱ्यांची परिभाषा एकदम पालटली आहे. हवेतले वादळी वारे शमले आहेत. पण ह्या वादळावर स्वार होता आले आणि बाळासाहेबांच्या इमानी सेवेच्या बळावर चव्हाणांचे प्रस्थ कमी करता आले तर पहावे हा इंदिराजींचा प्रयत्न दिसतो. ह्या प्रयत्नाच्या संदर्भात रघुनाथराव खाडिलकर यांची स्नेहभेट आठवावी. इंदिराजींच्या काँग्रेसमध्ये जग-जीवन व चव्हाण हे दोनच प्रतिस्पर्धी त्यांना आहेत. त्यांना वाढू न देणे हे त्यांच्या सत्ताकांडाचे एक उद्दिष्ट आहे. त्यांचा 'टोन' पाहून महाराष्ट्रातील प्रतिक्रिया पालटल्या असाव्या असे वाटते. बाळासाहेब देसायांनी इंडिकेट निष्ठा व्यक्त केली आहे. राजकारणातली फसवी परि-भाषा ज्यांना ठाऊक आहे त्यांच्या हे लक्षात येईल–की चव्हाण, नाईक, मोहिते यांतले आणि वसंतदादा पाटील–बाळासाहेबातील मतभेद आता निकरावर आले असून 'साखरपेरणी'चे शब्द आता राजिनाम्याच्या वादळात विरले आहेत. कदाचित–पण थांबूया!!

**– सारस्वत**

## आचार्य अत्रे पारितोषिके

**साहित्यसम्राट आचार्य अत्रे यांच्या प्रथम स्मृतिदिनानिमित्त यंदाच्या 'नवयुग' दिवाळी अंका-साठी दीड हजार रुपयांची पारि-तोषिके जाहीर करण्यात आली आहेत. कथा आणि कविता यांच्या-साठी पहिले पारितोषिक प्रत्येकी रु. ३००, दुसरे प्रत्येकी रु. २०० आणि तिसरे प्रत्येकी रु. १००, शिवाय उत्तेजनार्थ अनेक पारि-तोषिके देण्यात येणार आहेत. स्पर्धेसाठी पाठवावयाचे साहित्य दि. ३१ ऑगस्ट १९७० पूर्वी संपादक, 'नवयुग', शिवशक्ती, वरळी, मुंबई–१८ या पत्त्यावर पाठवावयाचे आहे.**

